# महाराष्ट्र विधानपरिषद

## दुसरे (पावसाळी) अधिवेशन, २०१८

---

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

---

### पुण्यासह राज्यातील विविध शासकीय कार्यालयातील अधिकारी/कर्मचाऱ्यांवर लाच घेतल्याप्रकरणी कारवाई करण्याबाबत

**(१) १२३५५ (२०-०४-२०१७). श्री.अनिल भोसले, श्री.नरेंद्र पाटील, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.किरण पावसकर, श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, ॲड.जयदेव गायकवाड, जयवंतराव जाधव, ॲड.राहुल नार्वेकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुण्यासह राज्यातील विविध शासकीय कार्यालयातील लाच घेतल्याप्रकरणी गुन्हा दाखल झालेल्या २०३ अधिकारी व कर्मचाऱ्यांना निलंबित न केल्याने अद्यापही ते त्यांच्या पदावर कार्यरत आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय,

(३) असल्यास, त्यात काय आढळून आले आहे,

(४) तद्नुसार, गट अ ते गट क मधील निलंबित असलेल्या व अद्याप निलंबित न होता कार्यरत असलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांची गटनिहाय प्रत्येकी संख्या किती आहे,

(५) उक्त प्रकरणी चौकशी व संबंधितांना निलंबित न करण्याची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२०-०६-२०१८) :** (१), (२), (३) व (४) राज्यातील विविध शासकिय कार्यालयातील लाचलुचपत प्रतिबंधक विभागाच्या, सापळा प्रकरणी दाखल झालेल्या गुन्हयांमध्ये अटक करण्यात आलेल्या वर्ग १, २, ३ व ४ च्या १२९ अधिकारी व कर्मचारी यांना संबंधित विभागाने निलंबित न केल्याने ते अद्यापही त्यांच्या पदावर कार्यरत आहेत. त्याचा तपशिल खालीलप्रमाणे आहे.

| सन | वर्ग | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | १ | २ | ३ | ४ | इलोसे | एकूण |
| एकुण | १९ | १५ | ५९ | ५ | ३१ | १२९ |

याशिवाय निलंबित केलेल्या अधिकारी/कर्मचारी यांची गटनिहाय संस्था खालीलप्रमाणे आहे.

| सन | वर्ग | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | १ | २ | ३ | ४ | इलोसे | एकूण |
| २०१६ | ७८ | ११७ | ७८३ | ५१ | १५ | १०४१ |
| २०१७ | ६७ | ९६ | ६६३ | ३८ | ३० | ८९४ |
| २०१८ आजपर्यंत | १० | १२ | ७५ | ९ | १ | १०७ |
| एकूण | १५२ | २२५ | १५२१ | ९५ | ४६ | २०४२ |

(५) याबाबत मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील आढावा बैठकीमध्ये आवश्यक कार्यवाही करण्याचा सुचना संबंधित विभागास देण्यात आल्या आहेत.

---

## मुंबई, नवी मुंबई तसेच ठाणे जिल्ह्यातील जुन्या व मोडकळीस आलेल्या अतिधोकादायक इमारती पाडण्याबाबत

**(२) १४३७२ (२०-०४-२०१७). ॲड.राहुल नार्वेकर, श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई, नवी मुंबई तसेच ठाणे जिल्ह्यातील जुन्या व मोडकळीस आलेल्या अतिधोकादायक इमारती पाडण्याचे आदेश नगरविकास विभागाने संबंधित महानगरपालिका अधिकाऱ्यांना दिले आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त परिसरातील किती इमारती निष्कासित केल्या आहेत व किती इमारती निष्कासित करण्याच्या बाकी आहेत,

(३) असल्यास, निष्कासित करण्याच्या बाकी असलेल्या इमारती किती कालावधीत निष्कासित करण्यात येणार आहेत,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०९-०५-२०१८) :** (१) जुन्या/ मोडकळीस आलेल्या इमारतीबाबत पावसाळयापुर्वी करावयाच्या कार्यवाहीसंदर्भात शासन परिपत्रक दिनांक ५ नोव्हेंबर, २०१५ अन्वये सर्व महानगरपालिकांना सूचना दिलेल्या आहेत.

(२) बृहनमुंबई, ठाणे, नवी मुंबई, कल्याण-डोंबिवली, मीरा-भाईंदर, उल्हासनगर, भिवंडी महानगरपालिकांकडून प्राप्त माहितीनुसार ३३६ धोकादायक इमारती निष्कसित केल्या आहेत.

(३) व (४) निष्कासित करावयाच्या उर्वरित इमारतीबाबत संबंधित न्यायालयीन प्रकरणे, संरचनात्मक तपासणी अहवाल इत्यादी आधारे महानगरपालिकास्तरावर कार्यवाही करण्यात येत आहे

---

## राज्यातील जमिनीतील पाण्याची पातळी खाली गेलेल्या भागात ऊस व भात पिकांची लागवड करण्यास बंदी घालण्याबाबत

**(३) १७३०७ (२०-०४-२०१७). श्री.आनंदराव पाटील, श्री.संजय दत्त, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **कृषी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) जमिनीतील पाण्याची पातळी खाली गेलेल्या व पाण्यात मर्यादेपेक्षा अधिक फ्लुरॉईड क्षार असलेल्या राज्यातील भागांत ऊस व भात या पिकांची लागवड करण्यास बंदी घालण्यासाठी राज्य सरकारने धोरणात्मक निर्णय घ्यावा अशी महत्वपूर्ण सूचना हरित लवादाने शासनाला केल्याचे माहे जानेवारी, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर प्रकरणी शासनाने कोणता निर्णय घेतला वा घेण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकांत पाटील (०६-०६-२०१८) :** (१) होय.

(२) हरित लवादाच्या निर्णयानुसार भुजल सर्वेक्षण यंत्रणेने राज्यातील १६ जिल्ह्यामध्ये पाणी परीक्षण केले आहे. सदर सर्वेक्षणामध्ये पाण्यातील फ्लोराईडचे प्रमाण हे पीक पध्दतीशी संबंधित नसून भौगोलिक स्त्रोत आहे.

तथापि, ऊस पिकाला मोठ्या प्रमाणावर पाणी लागत असल्याने ऊस पीकाखालील क्षेत्र विहीत कालावधीत सूक्ष्म सिंचनाखाली आणण्याच्या दृष्टीकोनातून प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत राबविण्यात येणाऱ्या नियमित केंद्र पुरस्कृत सुक्ष्म सिंचन योजने व्यतिरिक्त ऊस उत्पादक शेतकऱ्यांना सवलतीच्या व्याज दराने कर्ज उपलब्ध करुन देण्याची योजना राज्य शासनाने आखलेली आहे. सदर योजनेंतर्गत शेतकऱ्यांना २% दराने कर्ज उपलब्ध करुन देण्यात येणार आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## येवला (जि.नाशिक) तालुक्यातील अनुसूचित जमातीच्या मुलांच्या शिक्षणासाठी निवासी शासकीय आश्रमशाळा सुरु करण्याबाबत

**(४) १८५६६ (१९-०४-२०१७). :** श्री. जयवंतराव जाधव सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) येवला (जि.नाशिक) तालुक्यातील अनुसूचित जमातीच्या मुलांच्या शिक्षणासाठी निवासी शासकीय आश्रमशाळा सुरु करण्याची स्थानिक लोकप्रतिनिधींनी माहे ऑगस्ट, २०१५ मध्ये वा त्यासुमारास शासनाकडे मागणी केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर मागणीच्या अनुषंगाने आयुक्त, आदिवासी विकास नाशिक यांनी दिनांक ४ सप्टेंबर, २०१५ रोजी एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नाशिक यांच्याकडून प्रस्ताव मागविला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने येवला येथे निवासी शासकीय आश्रमशाळा सुरु करण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, नसल्यास विलंबाची करणे काय आहेत ?

**श्री.विष्णु सवरा (१७-०५-२०१८) :** (१) व (२) होय, हे खरे आहे.

(३) शासकीय आदिवासी आश्रमशाळा सुरू करण्यासाठी शासनाच्या प्रचलित निकषानूसार परिसरातील १० ते १५ गावातील आदिवासी लोकसंख्या ही एकूण ५ ते ७ हजार इतकी असणे आवश्यक असून येवला तालुक्यातील आदिवासी लोकसंख्या विशिष्ट भागात एकवटलेली नसल्यामूळे सदर निकष पूर्ण करित नाही. त्यामुळे सदर ठिकाणी आश्रमशाळा सुरू करणे शासन निकषामध्ये बसत नाही.

---

## नागपूर जिल्हयातील गावे ऑप्टीकल फायबर नेटवर्कने जोडण्याच्या योजनेबाबत

**(५) २०४२३ (२०-०४-२०१७). श्री.संजय दत्त, श्री.शरद रणपिसे, श्रीमती हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नागपूर जिल्ह्यातील ७७६ गावे येत्या ऑगस्टपर्यंत ऑप्टीकल फायबर नेटवर्कने जोडण्याची शासनाची योजना असल्याचे माहे मे, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, नागपूर जिल्ह्यातील पहिला डिजिटल जिल्हा म्हणून नवी ओळख देण्याचा प्रयत्न करुन महाराष्ट्र दिनी जिल्ह्यातील पाच डिजिटल गावांचा शुभारंभ करण्यात आला, परंतु शुभारंभाची औपचारिकता संपताच दोनच तासात डिजिटल गावाचे नेटवर्क बंद पडले, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन काय कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१९-०६-२०१८) :** (१) अंशत: खरे, केंद्र शासनाच्या National Optical Fiber नेटवर्क अंतर्गत BBNL या केंद्र शासनाच्या संस्थेव्दारे नागपूर जिल्ळ्यातील केंद्र शासनाची योजना आहे. सदर जोडणीनंतर टप्प्या टप्प्याने जिल्ह्यातील ग्रामपंचायतीमध्ये राज्य शासनामार्फत Digital Village योजनेतंर्गत तेथील स्थानिक नागरीकाकरीता Public Wi-Fi व्दारे Internet उपलब्ध करुन देण्याचे कार्य सुरु झाले. पहिल्या टप्प्यात ५ ग्रामपंचायतीना दिनांक १ मे २०१६ ला जोडण्यात आले. उर्वरित ७७१ पंचायती टप्प्या टप्प्याने जोडून Public Wifi उपलब्ध करुन देण्यात आले आहे.

(२) अंशत: होय. तांत्रिक कारणास्तव ग्रामपंचायतीमध्ये नेटवर्क काही काळा करीता बंद पडले होते.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील छोट्या नगरपालिकांमधील बीएसयुपी व आयएचएसडीपी योजनेंतर्गत मंजूर प्रकल्पांना पुरक निधी देण्याबाबत

**(६) २०८४१ (२०-०४-२०१७). श्री.हरिसिंग राठोड : तारांकित प्रश्न क्रमांक ११६५१ ला दिनांक २३ डिसेंबर, २०१५ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील छोट्या नगरपालिकांमध्ये बीएसयुपी व आयएचएसडीपी योजनेंतर्गत मंजूर झालेले प्रकल्प निधी अभावी प्रलंबित आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त नगरपालिकांतील मंजूर बीएसयुपी व आयएचएसडीपी योजनेंतर्गत प्रकल्प पूर्ण होण्याच्यादृष्टीने पुरक निधी उपलब्ध करून देण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (१८-०६-२०१८) :** (१) हे खरे नाही.

(२) प्रश्न उद्भवत नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## ग्रामीण भागात जलद सेवेसाठी बीएसएनएल ने नॅशनल फायबर ऑप्टीकल नेटवर्क हा महत्वाकांक्षी प्रकल्प राबविण्याबाबत

**(७) २२१०४ (२०-०४-२०१७). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) ग्रामीण भागात जलद सेवेसाठी बीएसएनएलने नॅशनल फायबर ऑप्टीकल नेटवर्क हा महत्वाकांक्षी प्रकल्प गेल्या वर्षी सुरु करुनही जळगाव जिल्ह्यातील ग्रामपंचायती अद्यापही या नेटवर्कशी जोडल्या गेल्या नाहीत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, पहिल्या पेजमध्ये केवळ २५० किमीचे झालेले काम अपूर्ण आहे, हे खरे आहे काय,
(३) असल्यास, राज्यातील ग्रामपंचायती हायटेक करण्याकरीता हे नेटवर्कचे काम पूर्ण करण्यासंदर्भांत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१३-०६-२०१८) :** (१) होय.
(२) होय.
(३) केंद्र शासनामार्फत राबविण्यात येत असलेला National Optical Fiber Network (NOFN) हा प्रकल्प सन २०१५ मध्ये सुधारित करुन त्याला भारतनेट असे नाव देण्यात आले. अपूर्ण काम भारतनेट प्रकल्पामार्फत सुधारणेसह राबविण्यात येणार आहे. तसेच NOFN मार्फत राज्यातील एका जिल्ह्यातील नेटवर्कचे कार्य केंद्र शासनाच्या निदेर्शानुसार पूर्ण करण्यात आले. उर्वरित जिल्ह्यातील अपूर्ण कार्य भारतनेट प्रकल्पामार्फत पूर्ण करण्यात येणार आहे.
(४) प्रश्न उद्‍भवत नाही.

---

## अहमदनगर जिल्ह्यात जनावरांच्या छावण्या मंजूर करण्याबाबत

**(८) २३२६८ (१८-०४-२०१७). डॉ.सुधीर तांबे, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अहमदनगर येथे दुष्काळात जनावरांच्या छावण्या चालविण्यासाठी अर्ज मागवणे व प्रक्रिया राबविण्यात वेळ जात असल्याने छावण्या सुरू होण्यास विलंब होत असल्यामुळे शासनाने छावण्या मंजूर करून स्वत: चालवाव्यात असा ठराव जिल्हा परिषदेच्या जलव्यवस्थापन व स्वच्छता समितीने केला असल्याने माहे मे, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, येथील जनावरांच्या छावण्यांतील शेणाचे पैसे कपात करून छावणी चालकांना अनुदान दिले जाणार आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, शासनाने सदर ठरावाच्या अनुषंगाने कोणता निर्णय घेतला आहे, तसेच, छावणी चालकांच्या अनुदानात कपात न करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२०-०६-२०१८) :** (१) होय.
(२) व (३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.एससीवाय-२०१५/प्र.क्र.२४८/म-७, दिनांक २० ऑगस्ट, २०१५ अन्वये चारा छावण्यांच्या खर्चाची मागणी मान्य करताना शेण विक्रीपोटी छावणीचालकांना मिळालेल्या उत्पन्नाची रक्कम विचारात घेऊन तेवढ्या रकमेची मागणी कमी करण्याबाबत निर्णय घेण्यात आला होता.

शासन पत्र दिनांक ०५/०४/२०१६ अन्वये अहमदनगर जिल्हयात चारा छावण्या उघडण्यास परवानगी देण्यात आली होती. त्यानुसार अहमदनगर जिल्हयामध्ये ३९ चारा छावण्या उघडण्यात आल्या होत्या.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**मौजे वडगाव बु. (ता.हवेली, जि.पुणे) येथील रहिवाशांची नांवे प्रॉपटी कार्डवर दाखल करण्याबाबत**

**(९) २९१२६ (१३-०४-२०१७). श्री.सुजितसिंह ठाकूर :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मौजे वडगाव बु. (ता.हवेली, जि.पुणे) येथील सर्व्हे क्र. ४३ व ४९ मधील रहिवाश्यांना प्रॉपर्टीकार्ड देण्यात आले असून उर्वरित रहिवाशांची नांवे दाखल करून धारकांस प्रॉपटी कार्ड देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे काय,

(२) असल्यास, रहिवाशांना प्रॉपर्टी कार्ड देण्याबाबत लोकप्रतिनिधिंनी मा.मुख्यमंत्री व जिल्हाधिकारी, पुणे यांच्याकडे पत्राद्वारे विनंती करूनही कोणतीच कार्यवाही झालेली नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१५-०६-२०१८) :** (१), (२) व (३) वडगाव बु., ता.हवेली येथील स.नं.४३ व ४९ मधील ग्रामस्थांच्या प्रॉपर्टी कार्डवर नावे दाखल करण्यासंदर्भात जिल्हाधिकारी, पुणे यांच्याकडून विभागीय आयुक्त, पुणे यांच्यामार्फत शासनास सादर करण्यात आलेल्या प्रस्तावावर शासनाच्या स्थायी धोरणानुसार कार्यवाही प्रगतीत आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबईतील पायाभूत प्रकल्पात बेरोजगारांना रोजगार उपलब्ध करुन देण्याबाबत

**(१०) २९२५१ (१३-०४-२०१७). श्री.जनार्दन चांदूरकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबईतील नागरिकांचा प्रवास सुखकर व्हावा यासाठी शासनाने अनेक पायाभूत प्रकल्पांची घोषणा केली असून मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणामार्फत (एमएमआरडीए) पाच मेट्रो प्रकल्प कार्यान्वित केले असल्यामुळे ५० हजाराहून अधिक जणांना रोजगार उपलब्ध होणार असल्याचे माहे डिसेंबर, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी किती बेरोजगारांना रोजगार उपलब्ध करुन देण्यात आला आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०८-०५-२०१८)** : (१) मेट्रो बृहत आराखड्याच्या अंमलबजावणी दरम्यान, तसेच मेट्रो रेल्वेच्या परिवालन व देखभाल व्यवस्थेसाठी अभियंते, व्यवस्थापक, कर्मचारी, कुशल व अकुशल कामगार याव्दारे सुमारे १०,००० प्रत्यक्ष रोजगार निर्माण होणार आहेत. तसेच उत्पादक, वितरक, मालपुवठादार, सेवापुरवठादार, पूरक वाहतूक व्यवस्था अशा माध्यमातून ४०,००० हून अधिक कुशल व अकुशल अप्रत्यक्ष रोजगार निर्माण होणार आहे.
(२) व (३) जसे जसे प्रकल्प हाती घेण्यात येतील, त्यावेळी बेरोजगारांना प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्ष रोजगार मिळणे अपेक्षित आहे.

---

## राज्यातील कारागृह विभागातील रिक्त पदे भरण्याबाबत

**(११) २९५८४ (१३-०४-२०१७). श्रीमती स्मिता वाघ, श्री.सुजितसिंह ठाकूर, श्री.जगन्नाथ शिंदे, श्री.आनंदराव पाटील :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील कारागृह विभागात १ हजार ६४ पदे रिक्त असल्याचे माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदरची पदे रिक्त असण्याची कारणे काय आहेत,
(३) असल्यास, ही रिक्त पदे तातडीने भरण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१५-०६-२०१८)** : (१) हे खरे नाही. जानेवारी, २०१७ अखेर कारागृह विभागामध्ये एकूण ७४९ पदे रिक्त आहेत.
(२) व (३) कारागृह विभाग हा संवेदनशील विभाग असल्याने व कारागृह सुरक्षा मजबूत करण्याच्याद्दष्टीने रिक्त असलेली पदे ५०% ऐवजी १००% पदे भरण्याच्य अनुषंगाने HPC ची मान्यता घेण्याची कार्यवाही सुरु आहे.

तसेच कारागृह शिपाई संवर्गातील २२६ रिक्त पदे भरण्यास दिनांक ५ फेब्रुवारी, २०१८ च्या पत्रान्वये मान्यता देण्यात आली असून संबंधित पोलीस घटक प्रमुख यांचेस्तरावर भरती प्रक्रिया सुरु करण्यात आली आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## म्हाडाच्या माध्यमातून अल्प व मध्यम उत्पन्न गटातील रहिवाशांसाठी गृहसंकुले उभारण्याबाबत

**(१२) ३२८६३ (११-०८-२०१७). श्री.रविंद्र फाटक :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) ठाणे, पालघर आणि रायगड जिल्ह्यात सुमारे १३ ठिकाणी म्हाडाच्या माध्यमातून अल्प आणि मध्यम उत्पन्न गटातील रहिवाशांसाठी गृहसंकुले उभारण्याच्या शासनाचा विचार आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, महसूल विभागाने ठाणे जिल्ह्यातील दिवा आणि कल्याण परिसरातील सुमारे १०० हेक्टर जमीन याकरीता वर्ग केली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदरहू गृहप्रकल्पाचे सर्वसाधारण स्वरुप काय आहे व त्याची अंमलबजावणी कधीपर्यंत होणे अपेक्षित आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (१२-०७-२०१८) :** (१) व (२) हे अंशत: खरे आहे.

भंडार्ली (स.न.८०,स.न.८१), भंडार्ली (स.नं.१३), गोठेघर (स.नं.१५७/१), खोणी (स.नं.१६२), शिरढोण (स.नं.८६,स.नं.९५), वावे,रायगड (स.नं.५), विरार-बोळीज (स.नं.३९२/अ-१) या जमिनींचा प्रधानमंत्री आवास योजना राबविण्यासाठी म्हाडास ताबा प्राप्त झाला आहे..
(३) पैकी स.नं.१३ भंडार्ली, स.नं.८०,८१ भंडार्ली, स.नं.१५७ गोठेघर, स.नं.१६२ खोणी, स.नं.८६,९५,१३३ शिरढोण या जमिनींवर प्रधानमंत्री आवास योजनेंतर्गत गृहनिर्माण योजना राबविण्याकरीता म्हाडाकडून टर्न की निविदेमार्फत मे.बी.जी.शिर्के यांची ठेकेदार म्हणून नियुक्ती करण्यात आली

आहे. स.क्र.१६२ मौजे-खोणे तसेच स.क्र.८६, ९५ शिरढोण येथे पहिल्या टप्प्यात अत्यल्प उत्पन्न गटाअंतर्गत अनुक्रमे १०१६ व १९०५ सदनिकांचे काम प्रगतीपथावर आहे. तसेच विरार-बोंळीज व वावे, रायगड येथील जमिनींवर गाळे बांधण्याकरीता टर्न की पध्दतीवर निविदा मागवण्याची कार्यवाही लवकरच करण्यात येत आहे
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**उस्मानाबाद येथे वीज जोडणी नसतानाही वीज बिल देण्यात येत असल्याबाबत**

**(१३) ३३७७५ (१९-०८-२०१७). श्री.सुजितसिंह ठाकूर :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) उस्मानाबाद येथील शेतकरी कैलास मारुती पिंपळे यांनी त्यांच्या मालकीच्या सर्वे नं ५३ मध्ये वीज कनेक्शनसाठी दिनांक १ जानेवारी, २०१० रोजी महावितरण आपल्या दारी या योजनेंतर्गत ५ एच पी शेती पंपाचे डिमांड भरुनही वीज जोडणी देण्यात आली नसल्याचे माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निर्दशनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर वीज जोडणी दिलेली नसतांना वीज बिल मात्र सुरु करण्यात आले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्‌नुसार दोषीविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (२५-०५-२०१८) :** (१) हे खरे नाही.
(२) हे खरे नाही.

मौजे वाघोली, ता.जि.उस्मानाबाद येथील शेतकरी श्री.कैलास मारुती पिंपळे यांनी ५ एच.पी. कृषीपंपाच्या वीज जोडणीकरीता महावितरण आपल्या दारी या योजनेंतर्गत पैसे भरले असून, सदर कनेक्शन केबलद्वारे चालू करण्यात आलेले आहे. त्यामुळे ग्राहकास वीज बील देण्यात आलेले आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील नगरपालिका व महानगरपालिकांमधील रिक्त पदे भरणेबाबत

**(१४) ३४०१० (११-०८-२०१७). श्री.गोपिकिशन बाजोरीया :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील २२७ नगरपालिका व २२ महानगरपालिका यांमधील अनेक महत्वाची पदे म्हणजे त्यामध्ये लेखापरिक्षक, उपआयुक्त, नगररचनाकार, सहायक नगररचनाकार व इतर पदे रिक्त आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, रिक्त असलेल्या पदांमुळे नगरपालिका व महानगरपालिका यामध्ये अंमलबजावणी करणे कठीण होत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, राज्यातील इतर जिल्ह्यातील नगरपालिकेपेक्षा अकोला, वाशिम व बुलढाणा या तीन जिल्ह्यातील नगरपालिका व अकोला महानगरपालिकेमध्ये मोठ्या प्रमाणात रिक्त पदे आहेत, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार उक्त रिक्त पदे भरण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२८-०६-२०१८) :** (१), (२), (३) व (४) राज्यातील नगरपरिषदांमधील राज्यसंवर्गातील रिक्त पदे सरळसेवेने भरण्यासाठी नगरपरिषद प्रशासन संचालनालयाकडून एकुण १८८९ पदांसाठी महापरीक्षा पोर्टल या यंत्रणेमार्फत दिनांक १८/०५/२०१८ ते दिनांक २३/०५/२०१८ या

कालावधीत पूर्व परीक्षा आयोजित करण्यात आली होती. त्यानुषंगाने भरतीसंदर्भातील पुढील कार्यवाही सुरू आहे.

नगर रचनाकार व विकास सेवा संवर्गातील नगरपरिषद/ नगरपंचायतींच्या मंजूर ५६९ पदांपैकी ४५५ पदे नगररचना व मूल्य निर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील संबंधित संवर्गातील अधिकाऱ्यांमधून प्रतिनियुक्तीने भरण्याचा निर्णय घेतला आहे.

महानगरपालिकेतील उपायुक्तांची पदे प्रतिनियुक्तीने भरण्याची प्रक्रिया सुरु आहे.

नगरपरिषदांमधील रिक्त पदांचा अतिरिक्त कार्यभार हा इतर नगरपरिषदांमधील संवर्गीय कर्मचाऱ्यांकडे देण्यात आलेला असून सदर कर्मचाऱ्यांकडून विकास कामे केली जात आहेत.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील राष्ट्रीय महामार्ग व राज्य महामार्गालगत खाजगी मालकीच्या संपादित केलेल्या जमिनीचा मोबदला देण्याबाबत

**(१५) ३४७९० (०३-०१-२०१८). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे, श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील राष्ट्रीय महामार्ग व राज्य महामार्गालगत असणाऱ्या पेट्रोल पंपावर शौचालय सुविधेसाठी शासनाने पेट्रोलपंप व्यावसायिकांना दोन ते पाच एकर जमीन देण्याचा निर्णय घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यातील राष्ट्रीय महामार्ग व राज्य महामार्गालगत असलेल्या किती पेट्रोल पंपाना जमिनी देण्यात आल्या असून, सदर जमिनी शासनाच्या मालकीच्या आहेत काय तसेच किती खाजगी मालकीच्या जमिनी यासाठी संपादित करण्यात आल्या आहेत,

(३) असल्यास, खाजगी जमिनी संपादित करण्यात आलेल्या जमीन मालकांना किती व कोणत्या प्रकारे मोबदला देण्यात आला असून पेट्रोल पंप व्यावसायिक व ऑईल कंपन्यांना मोफत जमीन देण्याची कारणे काय आहेत,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय,.चौकशीच्या अनुषंगाने जमिनी संपादित केलेल्या खाजगी मालकांना मोबदला देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२८-०६-२०१८) :** (१) नाही. तथापी, शासन निर्णय, सा.बा.वि., दिनांक २२ जून, २०१६ च्यान्वये सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारीतील राज्यमार्गालगत महिला प्रवाशांसाठी प्रसाधनगृह व जनसुविधा केंद्र बांधणेबाबतची कार्यवाही सार्वजनिक बांधकाम विभागाकडून करण्यात येत आहे. सदरहू जनसुविधा केंद्राचे बांधकाम शासनाच्या जमिनीवर अथवा खाजगी जागा भाडेपट्याने घेऊन करण्यात येणार असल्याने भूसंपादनाचा प्रश्न उद्भवत नाही.
(२) नाही.
(३), (४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

**महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या जमिनींच्या गैरव्यवहाराबाबत**

**(१६) ३४९४७ (०३-०१-२०१८). श्री.शरद रणपिसे, श्री.संजय दत्त, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील, श्री.रामहरी रुपनवर, श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.हरिसिंग राठोड, श्री.सुभाष झांबड, प्रा.जोगेन्द्र कवाडे, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.जनार्दन चांदूरकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाची सुमारे १२ हजार हेक्टर जमीन मोकळी करुन गैरव्यवहार केल्याप्रकरणी मा.उद्योग मंत्री यांच्यावर झालेल्या आरोपाच्या अनुषंगाने त्यांची माहे ऑगस्ट, २०१७ च्या शेवटच्या आठवड्यात चौकशी सुरु करण्यात आली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर चौकशी पूर्ण झाली आहे काय, त्यात काय आढळून आले व तदनुसार कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) असल्यास, चौकशीचे स्वरुप, कार्यकक्षा काय आहेत व त्यास किती कालावधी लागणार आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (३०-०५-२०१८) :** (१) ते (३) महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ यांची मौजे गोंदेदुमला आणि वाडिवरे, ता.इगतपुरी, जिल्हा नाशिक येथील अधिग्रहीत जमिन गैर अधिसूचीत करण्याच्या श्री.सुभाष देसाई, मा.मंत्री (उद्योग) यांनी घेतलेल्या निर्णयाबाबत विधानसभा व विधानपरिषद सदस्यांनी विधानमंडळाच्या दोन्हीही सभागृहात उपस्थित केलेल्या आरोपाची चौकशी करण्याकरीता दिनांक २८ ऑगस्ट, २०१७ च्या शासन निर्णयान्वये श्री.के.पी.बक्षी, निवृत्त अपर मुख्य सचिव यांची एक सदास्यीय समिती नियुक्ती करण्यात आली होती. सदर एक सदस्यीय समितीने चौकशीचा अहवाल शासनास सादर केला आहे. सदर अहवाल सामान्य प्रशासन विभागाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला आहे.

सदर चौकशीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे निश्चित करण्यात आली होती:-

अ) प्रश्नाधीन औद्योगिक क्षेत्रातील जमीन गैर अधिसुचित करण्याचा निर्णय घेण्यापूर्वी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंउळ यांनी मागील १५ वर्षात अन्य औद्योगिक क्षेत्रात व प्रश्नाधीन औद्योगिक क्षेत्रात जमीन गैर अधिसूचित करण्याचा निर्णय घेतला आहे का ?

आ) उक्त क्षेत्र गैरअधिसूचित करताना महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या अधिनियम अथवा महामंडळाच्या जमीन विषयक अधिनियम/नियम/मार्गदर्शक तत्वे यांच्यानुसार गैरअधिसूचित करण्यात आले आहे का ?

इ) उक्त क्षेत्र गैर अधिसूचित प्रकरणी Conflict of Interest निदर्शनास येतो का ?

ई) उक्त प्रकरणाच्य अनुषंगाने अन्य इतर महत्वाच्य त्रुटी/उणीवा निदर्शनास येतात का ?

सदर एक सदस्यीय समितीने चौकशीचा अहवाह शासनास सादर केला आहे. सदर अहवालातील काही निष्कर्ष व शिफारशी महाराष्ट्र विधानमंडळाचे अर्थसंकल्पीय अधिवेशन २०१८ च्या म.वि.स.नियम ४७ अन्वये मा.मुख्यमंत्री महोदयांनी दिनांक २८ मार्च, २०१८ रोजी सभागृहाच्या निदर्शनास आणून देण्यात आल्या आहेत.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## नालासोपारा (ता.वसई, जि.पालघर) येथील बौध्द स्तुपाच्या सुशोभिकरणाबाबत

**(१७) ३५१६६ (०४-०१-२०१८). श्रीमती विद्या चव्हाण** : सन्माननीय **सांस्कृतिक कार्य मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नालासोपारा (ता.वसई, जि.पालघर) येथील सम्राट अशोक यांनी बांधलेल्या बौध्द स्तुपाच्या सुशोभिकरणाचे सन २०११ मध्ये सुरु केलेले काम बंद असल्याचे दिनांक ३० सप्टेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्‌नुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१७-०७-२०१८)** : (१) हे खरे नाही.

भारतीय पुरातत्व सर्वेक्षण, मुंबई मंडल, सायन या कार्यालयाद्‌वारे नालासोपारा येथील बौध्द स्तुपाच्या कुंपणाच्या व आतील जागेच्या सुशोभिकरणाचे काम हाती घेण्यात आले होते. परंतु कुंपणातील जागेचे सपाटीकरण करताना बरेच लहान स्तुप प्रकाशात आले असल्याने सुशोभिकरणाचे काम बंद करण्यात आले. तथापि, कुंपणाचे काम जवळपास पूर्ण झाले आहे.

(२) प्रश्न उद्‌भवत नाही.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

### औषध नियंत्रण प्रयोग शाळेतील रिक्त पदे भरणेबाबत

**(१८) ३५३९४ (०३-०१-२०१८). श्री.सतिश चव्हाण, श्री.धनंजय मुंडे, श्री.विक्रम काळे, श्री.अमरसिंह पंडित, अब्दुल्लाखान दुर्राणी :** सन्माननीय **अन्न व औषध प्रशासन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात मुंबई व औरंगाबाद येथे अन्न व औषध प्रशासनाच्या औषध नियंत्रण प्रयोगशाळा आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, औषध नियंत्रण प्रयोगशाळेतील वर्ग १ सह ३९ पदे रिक्त असूनही औरंगाबाद कार्यालयातुन १० कर्मचारी नागपूर येथे वर्ग केले तसेच पदोन्नतीने भरावयाच्या पदाबाबतही मागील ३ वर्षापासून कार्यवाही झाली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन पदोन्नतीची व सरळसेवेची पदे भरण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीश बापट (१७-०३-२०१८) :** (१) होय.

(२) अन्न व औषध प्रशासनाच्या मुंबई येथील प्रयोगशाळेत वर्ग-१ ते वर्ग-४ या संवर्गातील एकूण ३६ पदे तर औरंगाबाद येथील प्रयोगशाळेत वर्ग-१ ते वर्ग-४ या संवर्गातील एकूण ०९ पदे सद्य:स्थितीत रिक्त आहेत.

नागपूर येथे नव्याने सुरू करण्यात आलेल्या अन्न व औषधी चाचणी प्रयोगशाळा कार्यन्वित करण्याकरीता दिनांक ०७/०९/२०१७ च्या शासन आदेशाव्दारे औरंगाबाद येथील प्रयोगशाळेतील ७ पदे तात्पुरत्या स्वरूपात नागपूर येथे वर्ग करण्यात आली आहेत.

दिनांक १४/०९/२०१७ च्या शासन आदेशान्वये प्रशासनातील ०५ वैज्ञानिक अधिकाऱ्यांना (गट-ब) वरिष्ठ वैज्ञानिक अधिकारी (गट-अ) या पदावर पदोन्नती देण्यात आलेली आहे.

(३) औषध नियंत्रण प्रयोगशाळेतील वरिष्ठ वैज्ञानिक अधिकारी, प्रशासकीय अधिकारी, वरिष्ठ तांत्रिक सहायक, विश्लेषण रसायन शास्त्रज्ञ या संवर्गातील सरळसेवेची व पदोन्नतीच्या कोट्यातील पदे भरण्याबाबत प्रशासनाच्या तसेच शासन स्तरावर कार्यवाही सुरू आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## कळवा-ऐरोली एलिव्हेटेड लिंक रेल्वे प्रकल्पाबाबत

**(१९) ३६२९० (०४-०१-२०१८). श्री.रविंद्र फाटक :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) ठाणेच्या पुढील रहिवाश्यांना नवी मुंबईमध्ये थेट जाता यावे यासाठी कळवा-ऐरोली एलिव्हेटेड लिंक रेल्वे प्रकल्पामुळे विस्थापित होणाऱ्या प्रकल्पग्रस्तांचे पुनर्वसन एमएमआरडीएतर्फे करण्यात येणार आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर कामाची निविदा प्रक्रिया माहे सप्टेंबर-ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान सुरु करण्यात आली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर प्रकल्पाचे काम केव्हा सुरु करण्यात येणार आहे व किती कालावधीत पूर्ण करण्यात येणार आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१०-०७-२०१८) :** (१), (२), (३) व (४) होय.

प्रस्तावित दिघा स्थानक व त्यानुषंगिक कामांची निविदा प्रक्रिया माहे सप्टेंबर-ऑक्टोंबर, २०१७ मध्ये सुरु करण्यात आली आहे. सदर कामे दिनांक १२/०४/२०१८ रोजी देण्यात आली असून सदर कामाची प्रत्यक्ष सुरुवात माहे मे, २०१८ मध्ये सुरु झाली आहे. या प्रकल्पाशी संबंधित उर्वरीत कामे भूमी अधिग्रहण आणि प्रकल्पग्रस्तांचे पुनर्वसन झाल्यानंतर मुंबई रेल्वे विकास महामंडळामार्फत सुरु करण्याचे नियोजित आहे.

---

## उजनी (जि.सोलापूर) धरणावर सौरऊर्जा प्रकल्प उभारण्याबाबत

**(२०) ३६५५४ (०३-०१-२०१८). प्रा.डॉ.तानाजी सावंत, श्री.हेमंत टकले, श्री.विक्रम काळे, श्री.नरेंद्र पाटील, श्री.किरण पावसकर, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सोलापूर, पुणे व अहमदनगर जिल्हयांसाठी उपयुक्त उजणी धरणावर जगातील सर्वात मोठा १००० मेगावॅटचा सौरऊर्जा प्रकल्प उभारण्यात येणार असून सदर प्रकल्पामुळे आगामी २५ वर्षात परिसरातील ५ हजार व्यक्तींना रोजगार उपलब्ध होणार आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर प्रकल्पामुळे धरणाची कोणत्याही प्रकारे हानी न होता व पारंपारीक मासेमारी आणि पर्यटन व्यवसायाला धोका न पोहचण्याच्या अटीवर शासन या प्रकल्पाला मान्यता देणार असल्याचे दिनांक २५ ऑक्टोबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर प्रकल्पाची सद्य:स्थिती काय आहे, प्रकल्प पूर्ण होण्यासाठी किती कालावधी लागणार आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (२९-०६-२०१८) :** (१) व (२) उजनी धरणावर १००० मे.वॅ. सौर ऊर्जा प्रकल्प उभारण्याबाबतचा प्रस्ताव शासन स्तरावर विचाराधीन आहे.

(३) सद्य परिस्थितीमध्ये महावितरण कंपनीने उजनी धरणावर तरंगता सौर ऊर्जा प्रकल्प उभारण्यासाठी स्वारस्य अभिव्यक्तीसाठी आमंत्रणाद्वारे इच्छुक सौर प्रकल्प विकासक/इच्छुक व्यक्तींकडून मत व सूचना मागविण्यात आलेल्या आहेत. प्राप्त सूचनांचा व प्रकल्प उभारण्यासाठी आवश्यक असलेल्या तांत्रिक, आर्थिक व पर्यावरण विषयक बाबींचा सखोल अभ्यास करण्यासाठी व कार्यपद्धती, अंमलबजावणी, अटी व शर्ती निश्चिती करण्यासाठी आणि संबंधित विभागांच्या परवानगींबाबत संचालक (वाणिज्य), महावितरण यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली आहे. सदर समितीचा अहवाल प्राप्त झाल्यानंतर संबंधित विभागांच्या सहमतीने पुढील कार्यवाही करण्याचे प्रस्तावित आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**कोळगाव (ता.करमाळा, जि.सोलापूर) येथील**
**महार वतनाची जमीन हडप केल्याबाबत**

**(२१) ३६६६४ (०३-०१-२०१८). श्री.रविंद्र फाटक :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कोळगाव (ता.करमाळा, जि.सोलापूर) येथील श्रीमती पुष्पा बाबुराव जागते यांची महार वतनाची हडप केलेली जमीन परत मिळण्याबाबत दिनांक २६ एप्रिल, २०१७ रोजी वा त्यासुमारास लोकप्रतिनिधींनी केलेल्या पत्राच्या अनुषंगाने मा.महसूल मंत्री यांनी प्राधान्याने चौकशी करण्याचे आदेश संबंधित जिल्हाधिकारी, सोलापूर यांना दिले आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने मा.महसूल मंत्री महोदयांनी दिलेल्या आदेशानुसार हडप केलेली जमीन परत देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१५-०६-२०१८) :** (१) होय. तथापि, सदर जमीन महार वतनाची नसून उपविभागीय अधिकारी, माढा विभाग, जि.सोलापूर यांच्या दिनांक ३०/१२/१९९२ रोजीच्या आदेशान्वये कायम लागणीसाठी दिलेली भोगवटादार वर्ग-२ संवर्गातील जमीन आहे.

(२) श्रीमती पुष्पा बाबुराव जागते व रेखा बाबुराव जागते यांनी त्यांच्या हिश्श्यातील ग.नं.१२५/१ पैकी ० हे. ४० आर. इतकी जमीन श्री.अंकुश राजाराम भोसले यांना सक्षम प्राधिकाऱ्याची पूर्व परवानगी न घेता विक्री केलेली आहे. तसेच श्री.अमीत जागते व श्रीमती सारिका जागते यांनी ग.नं.१२५/१ पैकी त्यांच्या हिश्श्यातील ० हे. ४७ आर. इतकी जमीन अनोंदणीकृत कब्जेसाठेखताने श्री.अंकुश राजाराम भोसले यांना वहिवाटीस दिली होती. यासंदर्भात श्री.भोसले यांनी तहसिलदार, करमाळा यांच्याकडे केलेल्या विनंती अर्जाच्या अनुषंगाने श्री.भोसले यांची सदर ० हे. ८७ आर. जमिनीमध्ये प्रत्यक्ष वहिवाट दिसून येत असल्याने तत्कालीन तहसिलदार, करमाळा यांनी त्यांच्या दिनांक २७/०४/२००७ रोजीच्या आदेशान्वये श्री.भोसले यांची सदर क्षेत्रावर वहिवाटदार

म्हणून नोंद घेण्याचा आदेश पारीत केला होता. प्रस्तुत प्रकरणी तत्कालिन तहसिलदार, करमाळा यांनी श्री.भोसले यांचा वहिवाटदार म्हणून नोंद करणेबाबत पारीत केलेला दिनांक २७/०४/२००७ रोजीचा आदेश जिल्हाधिकारी, सोलापूर यांच्या निदेशानुसार उपविभागीय अधिकारी, माढा यांनी महाराष्ट्र जमीन महसूल अधिनियम, १९६६ चे कलम २५८ अन्वये पुनर्विलोकनात घेऊन दिनांक २६/०४/२०१८ च्या आदेशान्वये रद्द केला आहे व प्रकरण फेरचौकशीसाठी तहसिलदार, करमाळा यांच्याकडे पाठविले आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**महिला अत्याचारासंदर्भात विशेष महिला तपास पथक स्थापन करणेबाबत**

**(२२) ३६८५२ (०४-०१-२०१८). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) गृह विभागामार्फत महिलांवरील अत्याचाराला प्रतिबंध तसेच महिला अत्याचारासंदर्भातील गुन्हे तपासासाठी राज्यातील प्रत्येक जिल्ह्यात विशेष महिला तपास पथक स्थापन करण्याची घोषणा करण्यात आली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, किती जिल्ह्यात विशेष महिला तपास पथकाची स्थापना करण्यात आली आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१३-०६-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) सर्व जिल्ह्यात विशेष पथकाची स्थापना करण्यात आलेली आहे.
(३) प्रश्न उदभवत नाही.

---

**कै.ना.मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्थेतील प्राध्यापकांनी गहाणखत नोंदणीकृत न करता आयकराचे लाभ घेतल्याबाबत**

**(२३) ३७२०८ (०४-०१-२०१८). श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.आनंदराव पाटील, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.संजय दत्त, श्री.रामहरी रुपनवर, डॉ.सुधीर तांबे, श्री.सुभाष झांबड, प्रा.जोगेन्द्र कवाडे, श्री.हरिसिंग राठोड, श्री.अमरनाथ राजूरकर, आर्कि.अनंत गाडगीळ :** सन्माननीय **कामगार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कै. ना. मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्थेतील शासनाच्या घर बांधणी अग्रिम प्रकरणात गहाणखत नोंदणीकृत करणे अनिवार्य आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, गहाणखत नोंदणीकृत न केल्यामुळे प्राध्यापकांना प्रत्यक्ष घर खरेदी न करता आयकराचे लाभ मिळाले आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, नोंदणीकृत नसलेले गहाणखत स्वीकारल्या प्रकरणी संबंधितांविरुद्ध कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.संभाजी पाटील-निलंगेकर (१४-०६-२०१८) :** (१) होय.

(२) व (३) कै.नारायण मेघाजी लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्थेच्या अहवालानुसार संस्थेतील अधिव्याख्याता पदावरील एका कर्मचाऱ्यास ऑगस्ट, २००० मध्ये अग्रिम मंजूर करण्यात आले होते. तथापि, गहाणखत घेतले नसल्याची बाब निदर्शनास आल्यानंतर गहाणखत घेण्यात आले आहे. तसेच सदर कर्मचाऱ्याकडून सन २०१२ पर्यंत मुद्दल व व्याजाची रक्कम वसुल करण्यात आली आहे. त्यामुळे, कै.नारायण मेघाजी लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्थेतील प्राध्यापकांना प्रत्यक्ष घर खरेदी न करता आयकराचे लाभ मिळाले आहेत, ही बाब वस्तुस्थितीस धरुन नाही. यास्तव कारवाई करण्याचा प्रश्न उद्भवत नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**कै.नारायण मेघाजी लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, परळ, मुंबई येथे अधिव्याख्याता, कामगार कल्याण यांचे नियुक्तीबाबत**

**(२४) ३७२०९ (०४-०१-२०१८). श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.आनंदराव पाटील, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.संजय दत्त, श्री.रामहरी रुपनवर, श्री.जनार्दन चांदूरकर, प्रा.जोगेन्द्र कवाडे, श्री.हरिसिंग राठोड, डॉ.सुधीर तांबे, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.सुभाष झांबड :** सन्माननीय **कामगार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कै. नारायण मेघाजी लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, परळ, मुंबई येथे अधिव्याख्याता, कामगार कल्याण हे पद प्रथमतः पदोन्नतीने भरण्याची सेवा प्रवेश नियमात तरतूद आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, संशोधन सहायक पदावरील पदधारक नामनिर्देशनाने पदभरतीसाठीच्या अटींची पूर्तता करीत असेल तर तो पदधारक पदोन्नतीसाठीच्या निवड सूचीसाठी पात्र ठरतो, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, संशोधन सहायक पदावरील पदधारकाचा पदोन्नतीसाठी विचार न करता अधिव्याख्याता, कामगार कल्याण हे पदोन्नतीचे पद नामनिर्देशनाने भरण्याचा प्रस्ताव लोकसेवा आयोगास सादर केला आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, अधिव्याख्याता, कामगार कल्याण हे पद नामनिर्देशनाने भरताना लोकसेवा आयोगाद्वारे घेण्यात आलेल्या मुलाखतीसाठी पात्र ठरलेल्या संशोधन सहायक पदावरील संबंधित महिला मागासवर्गीय कर्मचारी यांचेवर अन्याय करणाऱ्याविरुद्ध कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.संभाजी पाटील-निलंगेकर (१४-०६-२०१८) :** (१) अधिव्याख्याता (कामगार कल्याण) या पदाच्या सेवा प्रवेश नियमात सदरचे पद पदोन्नतीने अथवा बदलीने अथवा नामनिर्देशनाने भरण्याची तरतूद आहे.

(२) होय.

तथापि, अधिव्याख्याता (कामगार कल्याण) या पदावरील पदोन्नतीकरीता अधिव्याख्याता (कनिष्ठ श्रेणी), फॅकल्टी सहाय्यक व संशोधन सहाय्यक या पदावरील कर्मचारी जेष्ठतेनुसार पदोन्नतीसाठीच्या निवडसूचीमध्ये पात्र ठरतात.

(३) हे खरे नाही.

सदरचे पद एकाकी असून, वर नमूद केल्यानुसार तिन्ही मार्गांनी पद भरण्याची तरतूद सेवा प्रवेश नियमामध्ये असून, सदर पद फक्त पदोन्नतीकरीता राखीव नाही. यापूर्वी सदरचे पद पदोन्नतीने भरलेले असल्यामुळे, यावेळी सदर पद नामनिर्देशनाने भरण्याचा प्रस्ताव महाराष्ट्र लोकसेवा आयोगास विभागामार्फत २०१० मध्ये सादर करुन सदरचे पद महाराष्ट्र लोकसेवा आयोगाद्वारे विहित प्रक्रियेनुसार भरण्यात आले आहे.

(४) हे खरे नाही.

जेष्ठता सूचीनुसार संशोधन सहायक पदावरील संबंधित महिला मागासवर्गीय कर्मचारी हया जेष्ठता सूचीमध्ये जेष्ठत्तम नव्हत्या. जेष्ठतासूचीमध्ये संबंधित महिला कर्मचारी चौथ्या क्रमांकावर होत्या. सदर पद एकाकी असल्यामुळे मागासवर्गीय महिला कर्मचाऱ्याकरीता आरक्षण लागू नव्हते. त्यामुळे त्यांच्यावर अन्याय झाला या बाबीमध्ये तथ्य नाही.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**मौजे उमापूर (ता.गेवराई, जि.बीड) येथील शेतकरी पीक विम्याच्या लाभापासून वंचित राहिल्याबाबत**

**(२५) ३७६१५ (०३-०१-२०१८). श्री.अमरसिंह पंडित** : सन्माननीय **कृषी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजे उमापूर (ता.गेवराई, जि.बीड) येथील १२६५ शेतकऱ्यांनी दिनांक ३० जून, २०१६ रोजी वा त्यासुमारास पीक विमा हप्ता रुपये ४९.२२ लक्ष बँकेत जमा केल्यानंतर त्यांना रूपये ४.५० कोटी विमा मंजूर असतानाही लाभार्थी शेतकऱ्यांना बँकेने विम्याची रक्कम दिली नसल्याची तक्रार लोकप्रतिनिधींनी दिनांक २७/१०/२०१७ रोजी व त्यानंतर वारंवार जिल्हाधिकारी, बीड यांच्याकडे केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, बीड जिल्ह्यात स्टेट बँक ऑफ इंडिया, बीड जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक यासह अनेक बँकांनी पीक विम्याची रक्कम अद्याप प्रत्यक्ष शेतकऱ्यांना वाटप केली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने पीक विमा रक्कम पात्र लाभार्थ्यांना वाटप करण्यास विलंब करून या रकमेवर नफेखोरी करणाऱ्या बँकाच्या विरोधात कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) असल्यास, मौजे उमापूर येथील शेतकऱ्यांना विम्याची रक्कम केव्हा मिळणार आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०२-०७-२०१८) :** (१) हे खरे आहे.

खरीप हंगाम २०१६ मध्ये प्रधानमंत्री पीक विमा योजनेच्या मार्गदर्शक सूचनांनुसार उमापूर महसूल मंडळ, तालुका गेवराई, जिल्हा बीड, येथील कापूस पिकासाठी १५६२ शेतकऱ्यांनी रुपये ४९.२ लाख विमा हप्ता भरुन विमा संरक्षण घेतलेले होते. परंतु स्टेट बँकेने एच.डी.एफ.सी.इर्गो जनरल इन्शुरन्स या कंपनीकडे शेतकऱ्यांची माहिती पाठविताना महसूल मंडळ उमापूर ऐवजी महसूल मंडळ बीड अशी चुकीची माहिती पाठविली. त्यामुळे, कापूस पिकासाठी उमापूर महसूल मंडळासाठी नुकसान भरपाई मंजूर होवून सुध्दा विमा कंपनीने ती शेतकऱ्यांना दिलेली नाही. याबाबत लोकप्रतिनिधींनी जिल्हाधिकारी, बीड यांच्याकडे तक्रारी केलेल्या आहेत, हे खरे आहे.

(२) हे खरे नाही.

पीक विमा काढलेल्या बीड जिल्ह्यातील १३.५८ लाख शेतकऱ्यांपैकी ६ लाख शेतकऱ्यांना रुपये २३३ कोटी नुकसान भरपाई विमा कंपनीमार्फत निश्चित करुन संबंधित बँकांकडे वर्ग करण्यात आलेली आहे. बीड जिल्ह्यातील स्टेट बँक ऑफ इंडिया यांच्याकडे १.६० कोटी नुकसान भरपाई रक्कम विमा कंपनीमार्फत प्राप्त झाली होती. त्यापैकी रुपये १.२४ कोटी रक्कमेचे उपयोगिता प्रमाणपत्र विमा कंपनीस प्राप्त झालेले आहे. त्याच प्रमाणे विमा कंपनीकडून प्राप्त अहवालानुसार जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक बीड यांनी प्राप्त नुकसान भरपाईचे पूर्णपणे वाटप केलेले असून, त्याबाबतचे उपयोगिता प्रमाण पत्र विमा कंपनीस प्राप्त झालेले आहे.

(३) व (४) बीड जिल्हयामधील स्टेट बँक ऑफ इंडिया शाखा उमापूर यांचे स्तरावर झालेल्या चुकीमुळे शेतकरी नुकसान भरपाई पासून वंचित राहिलेले आहेत. योजनेच्या मार्गदर्शक सूचनांनुसार या शेतकऱ्यांना नुकसान भरपाई अदा करण्याची जबाबदारी स्टेट बँकेची आहे. त्यानुषंगाने सदर बँकेला नुकसान भरपाई अदा करणेबाबत आयुक्त (कृषी) स्तरावरुन, तसेच, अपर मुख्य सचिव (कृषी) यांचेस्तरावरुन देखील सूचना देण्यात आलेल्या आहेत. पात्र शेतकऱ्यांना नुकसान भरपाई मिळवून देण्याबाबत शासन प्रयत्नशिल आहे.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

**नाशिक कृषी उत्पन्न बाजार समितीचे विभाजन करून**
**नवीन बाजार समित्यांची निर्मिती करणेबाबत**

**(२६) ३७७३६ (०३-०४-२०१८). : तारांकित प्रश्न क्रमांक ३२०२० ला दिनांक १० ऑगस्ट, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **पणन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नाशिक येथील त्र्यंबकेश्वर, हरसुल व पेठ येथे बाजार समिती आवार नसणे, त्यामुळे खाजगी व्यापारी विविध शेतमाल खरेदी करीत असल्याने कृषी उत्पन्न बाजार समिती, नाशिक येथे शेतमाल न पोहचल्याने शासनाच्या महसूलाचे नुकसान होत असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, नाशिक कृषी उत्पन्न बाजार समितीचे विभाजन करून नवीन बाजार समित्यांची निर्मिती करण्याच्या अनुषंगाने शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) असल्यास, सदर निर्णय केव्हा घेण्यात येणार आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (२२-०५-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.
(२) व (३) नाशिक कृषी उत्पन्न बाजार समितीचे विभाजन करुन त्र्यंबकेश्वर व पेठ एकत्रित कृषी उत्पन्न बाजार समितीची निर्मिती करण्याबाबतचा प्रस्ताव महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळाच्यास्तरावर विचाराधीन आहे. सदर प्रस्ताव शासनास प्राप्त झाल्यानंतर योग्य ती कार्यवाही करण्यात येईल.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**गेवराई (जि.बीड) शहरातील हुतात्मा स्मृतीस्तंभ नष्ट केल्याबाबत**

**(२७) ३७८५२ (०६-०४-२०१८). श्री.अमरसिंह पंडित, श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण, श्री.विक्रम काळे, श्री.सुनिल तटकरे, श्री.नरेंद्र पाटील : तारांकित प्रश्न क्रमांक २२५९० ला दिनांक २७ जुलै, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) गेवराई (जि.बीड) येथे मराठवाडा मुक्ती संग्रामातील हुतात्म्यांच्या स्मरणार्थ उभारलेला स्मृतीस्तंभ नगरपरिषदेने शासनाची कोणतीही परवानगी न घेता आणि संबंधित विभागास कोणतीही पूर्व सूचना न देता नगरपरिषदेच्या इमारत बांधकामासाठी निष्कासित केल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, स्मृतीस्तंभ पडल्याबाबतची स्वतंत्र चौकशी करून एक महिन्यात अहवाल सादर करणार असल्याचे जिल्हाधिकारी, बीड यांनी शासनास अवगत केले होते, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, हुतात्मा स्मृतीस्तंभ नष्ट करणे, कुटुंबातील वेगवेगळ्या व्यक्तीच्या नावे बोगस शौचालय बांधल्याचे दाखवुन अपहार केल्याप्रकरणाची चौकशी विहित मुदतीत करण्याची मागणी स्थानिक लोकप्रतिनिधींनी जिल्हाधिकारी, बीड यांच्याकडे दिनांक १६ ऑगस्ट, २०१६ रोजी वा त्यासुमारास केली आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, तद्‌नुसार उपरोक्त गैरप्रकारासंदर्भात कारवाई करण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१९-०६-२०१८) :** (१) मराठवाडा मुक्ती संग्रामातील हुतात्म्यांच्या स्मरणार्थ स्मृतीस्तंभ उभारल्याबाबत नगरपरिषद कार्यालयात कसलीही नोंद दिसून येत नाही. तसेच कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, बीड यांचे कार्यालयातही मुक्ती संग्रामातील हुतात्म्यांच्या स्मरणार्थ स्मृतीस्तंभाबाबतची अभिलेखे उपलब्ध नसल्याचे जिल्हाधिकारी यांनी कळविले आहे. परंतु नगरपरिषद आवारात एक अत्यंत जीर्ण झालेला स्मृतीस्तंभ होता, त्याची पडझड झाली असल्याने सदर स्मृतीस्तंभाचे महत्व लक्षात घेवून त्याविषयी आदर राखण्याच्यादृष्टीने नगरपरिषद इमारतीच्या आवारातच इतर ठिकाणी करण्याचा ठराव नगरपरिषदेच्या सर्वसाधारण सभेत मंजूर केला असल्याचे मुख्याधिकारी, नगरपरिषद गेवराई यांनी कळविले आहे.
(२) व (३) होय.
(४) गेवराई नगरपरिषदेच्या सर्वसाधारण सभेत ठराव क्र.४ अन्वये, हुतात्मा स्मृतीस्तंभ नुतनीकरण करुन नगरपरिषदेच्या आवारात इतर ठिकाणी बसविण्याचे ठरविले असल्याने चौकशी करण्याचा अथवा दोषींविरुद्ध कारवाई करण्याचा प्रश्न उद्‌भवत नसल्याचे जिल्हाधिकारी, बीड यांच्या अहवालात नमूद केले आहे.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबई-नाशिक महामार्गावरील टोल वसुली बंद करण्याबाबत

**(२८) ३७९७२ (०५-०४-२०१८). : डॉ. अपूर्व हिरे : तारांकित प्रश्न क्रमांक ३५१०० ला दिनांक १९ डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नाशिक जिल्ह्यातील मुंबई-नाशिक महामार्गावरील पिंपळगांव (बसवंत) ते गोंदे महामार्गावरील विल्होळी, ओझर व पिंपळगांव बसवंत येथील रस्ता मार्ग रुंदीकरणाची कामे अपूर्ण असूनही टोल वसुली केली जात असल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय

(२) असल्यास, स्थानिकांच्या विविध मागण्यांमुळे वरील गांवातील तीन कि.मी. लांबीत राष्ट्रीय महामार्गाच्या सहा पदरीकरणाचे-रुंदीकरणाचे काम पूर्ण न झाल्याने वारंवार होणारी वाहतुक कोंडी, वाहन चालकांना होणारा मनस्ताप, टोल बुथ चालकांकडून वाहनधारकांना दिली जाणारी अनिष्ठ वागणुक याविषयी वाहन चालकांच्या अनेक तक्रारी असल्याने सदर मार्गावरील रस्ता रुंदीकरणाचे-सहापदरीकरणाचे संपूर्ण काम पूर्ण होईपर्यंत टोल वसुली करण्यात येवू नये, अशी मागणी शासनाकडे केली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने पिंपळगांव (बसवंत) ते गोंदे महामार्गावरील रस्ता मार्ग रुंदीकरण करण्याचे काम पूर्ण करून सदर रस्त्यांच्या रुंदीकरणाचे काम पूर्ण होईपर्यंत टोल वसुली बंद करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१५-०५-२०१८)** : (१) केंद्र शासनाच्या रस्ते वाहतूक व महामार्ग मंत्रालय यांच्या वतीने भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरणा मार्फत रा.म.क्र.३, पिंपळगाव नाशिक ६० कि.मी. लांबीचा सहापदरीकरणाचा प्रकल्प राबविण्यात येत आहे. सद्य:स्थितीत ६० कि.मी. पैकी ५७ कि.मी. चे काम पूर्ण झाले असून, सवलतकाराच्या करारनामानुसार ७५% पेक्षा अधिक प्रकल्प पूर्ण झाला तर टोल वसूली आकारली जाऊ शकते. त्यामुळे टोल आकारणी केली जात असल्याचे प्रकल्प संचालक,भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण,नाशिक यांनी कळविले आहे.
(२) उपलब्ध अभिलेख्यावरुन अशा आशयाचे निवेदन अप्राप्त असल्याचे दिसून येते. तसेच भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण यांचे कार्यालयासही निवेदन प्राप्त असल्याबाबत अहवालत नमूद केले नाही.
(३) सवलतकाराच्या करारनाम्याप्रमाणे ६० कि.मी. पैकी पूर्ण झालेल्या ५७ कि.मी. लांबीच्या रस्त्यासाठी पथकर आकारणी करण्यात येत असल्याचे प्रकल्प संचालक,भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण, नाशिक यांनी कळविले आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## पालघर जिल्ह्यात महत्त्वाची शासकीय कार्यालये सुरू करण्याबाबत

**(२९) ३८००५ (०५-०४-२०१८). श्री.संजय दत्त, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.रामहरी रुपनवर, श्री.जगन्नाथ शिंदे : तारांकित प्रश्न क्रमांक ३६०१७ ला दिनांक १९ डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पालघर जिल्ह्याची स्थापना होऊन तीन वर्षे झाली तरी अनेक शासकीय विभागांची कार्यालये उपलब्ध नसल्याचे माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, पालघर जिल्ह्यात ३३ विभागांची कार्यालये असून २९ महत्वाच्या विभागांच्या कार्यालयांचा कारभार मुंबई व ठाण्यातून सुरु असल्याने पालघर जिल्ह्यातील दुर्गम भागातील नागरिकांना त्रास सहन करावा लागत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून उर्वरित २९ महत्वाची संबंधित कार्यालये पालघर जिल्ह्यात सुरु करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२०-०६-२०१८) :** (१), (२) व (३) पालघर जिल्ह्यातील जनतेच्या गरजेची व दैनदिन कामकाजाशी संबंधित ३३ शासकीय कार्यालये स्थापन करण्यात आली आहेत. उर्वरीत २८ कार्यालये स्थापन करण्याबाबत संबंधित विभागांमार्फत कार्यवाही सुरु आहे. मा.मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली नवनिर्मित पालघर जिल्ह्याच्या समस्यांसंदर्भात दिनांक १८/११/२०१५ रोजी झालेल्या बैठकीत मा.मुख्यमंत्री महोदयांनी नवनिर्मित पालघर जिल्ह्याकरीता महत्वाची नवीन कार्यालये प्राधान्यक्रमानुसार सुरु करण्यात यावीत असे सर्व संबंधित विभागांना निदेश दिले आहे.

शासन निर्णय दिनांक २९/६/२०१६ अन्वये नवनिर्मित पालघर जिल्ह्याच्या ठिकाणी जिल्हास्तरीय कार्यालये स्थापित व्हावित म्हणून शासनाने मौजे पालघर, कोळगाव, मोरेकुरण, नंडोरे, दापोली, टेंभोर्डे व

शिरगांव या ०७ गांवातील एकूण ४४०-५७.९० हे.आर. शासकीय जमिनीवर पालघर जिल्ह्याचे मुख्यालय तसेच पालघर नवनगर सिडको मार्फत विकसित करणेकामी मान्यता दिलेली आहे. त्यानुसार पालघर जिल्हा मुख्यालयाचे व इतर जिल्हा शासकीय कार्यालयांच्या इमारतीचे बांधकाम प्रगतीपथावर आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**रत्नागिरी शहरातील अग्निशमन यंत्रणेबाबत**

**(३०) ३८२२४ (०६-०४-२०१८). श्री.प्रसाद लाड :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) रत्नागिरी शहरामध्ये नवीन इमारतीना २४ मीटर पर्यंत उंच बांधकाम करण्याची परवानगी बांधकाम व्यावसायिकांना मिळत असून त्यामुळे ७ मजल्याच्या इमारती शहरात उभ्या राहणार आहेत पण सदर इमारतीत आग लागण्याचे प्रसंग भविष्यात उदभवले तर आग शमविण्यासाठी नगरपालिकेकडे तशी सक्षम यंत्रणा व अधिकारी नाहीत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, अग्निशमन अधिकाऱ्यांचे व त्यांच्या दोन सहाय्यक अधिकाऱ्यांचे रिक्त पदे केव्हा भरली जाणार आहेत तसेच उंच स्वयंचलित शिडी व उपयुक्त फायर फायटिंग देण्याबाबत शासन विचाराधीन आहे काय,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१४-०६-२०१८) :** (१) रत्नागिरी शहरामध्ये १५ मी. पेक्षा जास्त उंचीच्या इमारतींना परवानगी देताना अग्निशमन सेवा संचालनालय, महाराष्ट्र राज्य यांचा नाहरकत दाखला प्रमाणपत्र आल्यानंतर इमारतींना भोगवटा प्रमाणपत्र दिले जाते, ही वस्तुस्थिती आहे.

तथापि, नगरपरिषदेची अग्निशमन यंत्रणा सक्षम करण्याचे सद्य:स्थितीत प्रस्तावित आहे.

(२) अग्निशमन अधिकाऱ्याचे पद राज्यस्तरीय संवर्गामधुन मंजूर असून सहाय्यक अधिकाऱ्याचे पद पदोन्नतीने भरावयाचे आहे. उपरोक्त पदे नजीकच्या काळात भरणे प्रस्तावित असून उंच स्वयंचलित शिडी व फायर फायटिंग उपकरणे संदर्भात नगर परिषदेकडुन चालू आर्थिक वर्षात तजवीज करण्यात येत आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**परभणी जिल्ह्यातील अवैध वाळू उत्खनन व साठ्यांबाबत**

**(३१) ३८४६४ (०५-०४-२०१८). श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.धनंजय मुंडे, श्री.अमरसिंह पंडित, श्री.सतिश चव्हाण : तारांकित प्रश्न क्रमांक ३६९३३ ला दिनांक १९ डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) परभणी जिल्ह्यातील गोदावरी नदी पात्रातील अवैध वाळू उत्खनन तसेच जिल्ह्यातील वाळू साठ्यांबाबतची चौकशी ETS मशीन व राज्यस्तरीय भरारी पथकाव्दारे करण्यात यावी अशी मागणी परभणी येथील सामाजिक कार्यकर्त्यांनी माहे ऑक्टोबर-नोव्हेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान प्रधान सचिव, महसूल यांच्याकडे लेखी निवेदनाव्दारे केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, प्रमाणित क्षेत्रापेक्षा करण्यात आलेले जास्तीचे वाळू उत्खनन, परवानगी शिवाय करण्यात आलेले वाळू साठे तसेच मोजणीपेक्षा कमी असलेले वाळू साठे व इतर सर्व प्रकरणांची ETS मशीनव्दारे तसेच राज्यस्तरीय भरारी पथकामार्फत चौकशी करण्यात आली आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने दोषींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१८-०६-२०१८) :** (१), (२) व (३) अशा प्रकारचे निवेदन प्राप्त झाल्याचे आढळून आले नाही.

तथापि, परभणी जिल्ह्यात सन २०१६-१७ मध्ये लिलावात अंतिम करण्यात आलेल्या वाळूघाटाची व अवैध साठवणूक केलेल्या वाळूसाठ्याची ई.टी.एस. मशीनद्वारे मोजणी करण्याचे प्रस्तावित होते. तथापि, ज्या रेती घाटामध्ये पाणी नव्हते अशा रेती घाटाची ई.टी.एस. मशीनद्वारे मोजणी करण्यात आली आहे. ई.टी.एस. मशीनद्वारे मोजणी अंती ज्या वाळूघाटातून मंजूर परिमाणापेक्षा अधिक उत्खनन केल्याचे आढळून आले अशा वाळूगटाच्या लिलावधारकांची अनामत रक्कम जप्त करण्यात आली आहे.

माहे मार्च, २०१८ अखेर परभणी जिल्ह्यातील ६१९ अवैध वाळूसाठ्यापैकी ४९३ वाळूसाठ्यांच्या लिलावातून रुपये ७,०३,४४,२५०/- इतका महसूल शासनास प्राप्त झाला आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**अलिबाग तालुक्यातील (जि.रायगड) नवेदर नवगाव ग्रामपंचायत हद्दीतील सागरी धूप प्रतिबंधक बंधारे बांधण्याबाबत**

**(३२) ३८६७७ (०५-०४-२०१८). श्री.जयंत पाटील : तारांकित प्रश्न क्रमांक ३५६३४ ला दिनांक १९ डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अलिबाग (जि.रायगड) तालुक्यातील नवेदर नवगाव ग्रामपंचायत हद्दीमध्ये २ कि.मी. लांबीचा समुद्र किनारा असून या किनाऱ्यावर काही ठिकाणी सुमारे २० वर्षापूर्वी सागरी धूप प्रतिबंधक बंधारा बांधण्यात आलेला असून काही ठिकाणी नैसर्गिकपणे बंधारा तयार झालेला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, दिनांक २७ जून, २०१७ व दिनांक २ जुलै, २०१७ रोजी तसेच दिनांक ३ डिसेंबर, २०१७ ते दिनांक ६ डिसेंबर, २०१७ रोजी आलेल्या ओखी चक्रीवादळामुळे समुद्राच्या मोठ्या भरतीमुळे लाटांनी सदर बंधारे फुटल्याने अलिबाग तालुक्यातील गावात तसेच राऊत आळी येथे बंधारा नसल्यामुळे समुद्राचे पाणी गावात शिरुन कोळीबांधव व शेतकऱ्यांचे नुकसान झाले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, किनारा अभियंता, बांद्रा (पूर्व) मुंबई यांनी स्पष्टीकरण देताना पर्यावरण विभागाने अद्याप परवानगी न दिल्याने अर्थसंकल्प सन २०१६-१७ मधील लेखाशिर्ष ४७११ अंतर्गत रूपये ३ कोटी मंजूर झालेले असूनही सदर बंधाऱ्यांचे काम करण्यात आलेले नाही, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन धुप प्रतिबंधक बंधारे बांधण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत?

**श्री.चंद्रकांत पाटील (१२-०६-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) राऊतआळी येथे अस्तित्वातील नैसर्गिक मातीच्या बंधाऱ्याला ओखी वादळामुळे दोन ठिकाणी भगदाड पडून मोकळया भागात पाणी शिरले होते. तथापि, गावकऱ्यांचे कोणतेही नुकसान झाले नसल्याचे तहसिलदार, अलिबाग यांनी कळविले आहे.
(३) हे खरे आहे.
(४) व (५) सन २०१६-१७ च्या ४९ कामांपैकी ४६ कामांचे प्रस्ताव महाराष्ट्र सागरी किनारा व्यवस्थापन प्राधिकरण (MCZMA) कडे CRZ मंजूरीसाठी सादर करण्यात आली असता सदर कामांबाबत विविध बैठकांमध्ये चर्चा होऊन यापैकी १३ कामांची पर्यावरण आघात मुल्यांकन समिती (SEIAA) या समितीकडे शिफारस करण्यात आली. सद्य:स्थितीत CRZ मंजूरीसाठी राष्ट्रीय हरीत लवाद (NGT) ची दिनांक १८ जुलै, २०१८ पर्यंत स्थगिती असल्याने CRZ मंजूरीअभावी एकही काम हाती घेता आलेले नाही.

---

## पशुवैद्यकिय केंद्रातून भटक्या कुत्र्यांच्या निर्बिजीकरणाची मोहिम राबविण्याबाबत

**(३३) ३८८९१ (०५-०४-२०१८). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.हेमंत टकले, श्री.धनंजय मुंडे, श्री.किरण पावसकर, श्री.नरेंद्र पाटील, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर :** सन्माननीय **पशुसंवर्धन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) भटक्या कुत्र्यांच्या चावण्यामुळे शेतकरी, गाई-गुरे यांच्या आरोग्याची मोठी समस्या निर्माण झालेली असूनही पशुवैद्यकिय केंद्रातून कुत्र्यांच्या निर्बिजीकरणाची मोहिम शासन चालवत नसल्याचे माहे डिसेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.महादेव जानकर (०४-०७-२०१८) :** (१) हे खरे नाही.

पशुवैद्यकीय दवाखान्यांमध्ये नागरीक, पशुपालक किंवा प्राणी कल्याण संस्था यांच्याकडून दवाखान्यात आणलेल्या कुत्र्यांवर आवश्यक सेवा शुल्क आकारून ॲन्टी रेबीज लसीकरण (ARY) तसेच निर्बीजीकरण (ABC) बाबतच्या सेवा देण्यात येतात.
(२) प्रश्न उद्भवत नाही.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**कल्याण-डोंबिवली शहरात सोनसाखळी व मंगळसूत्र चोरीच्या घटनांना प्रतिबंध घालण्याबाबत**

**(३४) ३९११६ (०६-०४-२०१८). श्री.परिणय फुके :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) कल्याण-डोंबिवली शहरात सोनसाखळी व मंगळसूत्र चोरीच्या घटनांमध्ये दिवसेंदिवस वाढ होत असून दिनांक ७ ऑक्टोबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास कल्याण व डोंबिवली शहरात सोनसाखळी व मंगळसूत्र चोरीच्या पाच घटनांची विविध पोलीस ठाण्यात नोंद झाली असल्याने महिला वर्गात भीतीचे वातावरण निर्माण झाले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, दिनांक १ जानेवारी, २०१७ ते दिनांक १५ ऑक्टोबर, २०१७ या कालावधीत कल्याण-डोंबिवली शहरात सोनसाखळी व मंगळसूत्र चोरी, लुटमार अशा एकूण किती घडल्या आहेत व किती घटनांमध्ये तपास करून गुन्हेगारांना अटक करण्यात आली आहे,
(३) असल्यास, राज्यात इतर ठिकाणी अशा प्रकारच्या घटनांतील आरोपी अल्प मुदतीत सुटल्यानंतर पुन्हा हेच गुन्हे करत असल्याने अशा गुन्हेगारांवर कायमचे नियंत्रण आणण्यासाठी शासन कायद्यात बदल करून विशेष कृती आराखडा तयार करणार आहे काय,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१६-०५-२०१८) :** (१) सदरहू घटना ठाणे पोलीस आयुक्यालय अंतर्गत परिमंडळ-३ कल्याण-डोंबिवली शहारात सोनसाखळी व मंगळसुत्र चोरीच्या घटनेबाबत एकुण ५ गुन्हे दाखल असून त्यापैकी ३ गुन्हे उघडकीस आले आहेत. सदर गुन्हयातील ७ आरोपींना अटक करण्यात आली असून ३ गुन्हयातील २ बाबत मा.न्यायालयात दोषारोपपत्र दाखल केले असून १ गुन्हा तपासावर आहे. व २ गुन्हयाची “अ” फायनल समरी मंजुर केली आहे. या घटनेबाबत भितीचे वातावरण निर्माण झाले आहे, हे खरे नाही.
(२) दिनांक १ जानेवारी २०१७ ते १५ आक्टोंबर २०१७ या कालावधीत कल्याण व डोंबिवली शहरात सोनसाखळी व मंगळसूत्र चोरीचे एकुण ९२ गुन्हे दाखल असून त्यापैकी ३६ गुन्हे उघडकीस आले आहे. यात एकुण ७० गुन्हेगारांना अटक करण्यात आलेली आहे. तसेच लुटमारीचे एकुण ९७ गुन्हे दाखल असून ४८ गुन्हे उघडकीस आले आहे. यात एकुण ६६ गुन्हेगारांना अटक करण्यात आली आहे.
(३) अशा प्रकारच्या घटनांतील आरोपी अल्पमुदतीत सुटल्यानंतर पुन्हा हेच गुन्हे करत असल्याचे आढळुन आल्यास अशा गुन्हेगारांवर कायमचे नियंत्रण आणण्यासाठी मोक्का कायदयाअन्वये कारवाई करण्यात येते.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील कारागृहांची दुरवस्था झाल्याबाबत

**(३५) ३९१२१ (०६-०४-२०१८). श्री.चंद्रकांत रघुवंशी, श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.शरद रणपिसे, श्री.संजय दत्त, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील, डॉ.सुधीर तांबे, श्री.रामहरी रुपनवर, श्री.हरिसिंग राठोड, श्री.सुभाष झांबड, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील, श्री.मोहनराव कदम : तारांकित प्रश्न क्रमांक ३५८८६ ला दिनांक २० डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात ९ मध्यवर्ती कारागृह, ३१ जिल्हा कारागृह, १३ खुले कारागृह व १७२ उप कारागृह असून पुणे व मुंबई येथे महिलांकरीता स्वतंत्र कारागृह असून या कारागृहांमध्ये क्षमतेपेक्षा अधिक कैदी ठेवले जात असल्याची बाब निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, कैद्यांना तुरूंगात दाटीवाटीने रहावे लागत असल्याने त्यांना संसर्गजन्य रोगांची लागण होत असून त्यांना आवश्यक सोईसुविधा मिळत नाहीत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून राज्यातील कारागृहांतील कैद्यांची क्षमता वाढविण्यासंदर्भात तसेच नवीन कारागृह बांधण्याबाबत व कैद्यांना आहारासह आवश्यक त्या सोयीसुविधा देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१३-०७-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) हे खरे नाही. राज्यातील सर्व कारागृहामध्ये कारागृह रुग्णालय असून आजारी बंदयांना वैद्यकीय तपासणी व औषधोपचारासाठी सामान्य रुग्णालयातील वैद्यकीय अधिकारी कारागृहास भेट देऊन वैद्यकीय तपासणी करुन औषधोपचार करतात. याशिवाय त्वचारोग, दंतरोग, क्षयरोग, कर्करोग, व्यसन मुक्ती शिबीर व महिला बंद्यांसाठी स्त्रीरोग चिकित्सा शिबीर आयोजित केली जातात. त्यामुळे बंद्यांना आवश्यक वैद्यकीय सुविधा पुरविण्यात येत आहेत.

(३) सध्याच्या कारागृहाचा सर्वकष विचार करुन सर्व सुखसोयीसह आदर्श कारागृह निर्माण करण्यासाठी आणि अस्तित्वात असलेल्या कारागृहाचे अद्यावतीकरण करण्यासाठी आवश्यक शिफारसी तसेच भविष्यातील २५-३० वर्षे कालावधीचा विचार करुन नविन कारागृह बांधणे व अस्तित्वातील कारागृहांची बंदीक्षमता वाढविण्यासाठी तसेच सर्वसमावेशक सुधारणा सुचविण्यासाठी सेवानिवृत्त न्यायाधिश डॉ.राधाकृष्णन यांच्या अध्यक्षतेखाली समिती स्थापन करण्यात आली आहे. सदर समितीने दिनांक २६/६/२०१८ रोजी आपला अहवाल सादर केला असून त्याची छाननी सुरु आहे.

कारागृहातील बंद्याना दिनांक २७/५/२००५ च्या अधिसूचनेन्वये बंद्याच्या आहाराचे प्रमाण निश्चित केले असून त्यानुसार आहार देण्यात येतो. तसेच कारागृह उपहारगृहामार्फत बंदयांना आवश्यक त्या खाद्यपदार्थ वस्तुची विक्री केली जाते. याशिवाय प्रत्येक कारागृह स्तरावर एक आहारतज्ञ व स्वच्छता समिती स्थापन केली असून समितीमार्फत कारागृहातील आहाराची नियमित तपासणी केली जाते.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## पनवेल महानगरपालिकेचे आयुक्त यांना ठार मारण्याची धमकी निनावी पत्राद्वारे देण्यात आल्याबाबत

**(३६) ३९१५८ (०६-०४-२०१८). श्री.बाळाराम पाटील** : सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पनवेल महानगरपालिकेचे आयुक्त डॉ.सुधाकर शिंदे यांना ठार मारण्याची धमकी निनावी पत्राद्वारे देण्यात आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, नवी मुंबई पोलीस आयुक्तांकडे करण्यात आलेल्या तक्रारीनुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) असल्यास, कार्यक्षम सनदी अधिकाऱ्यांना संरक्षण देण्यासाठी शासनाने कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१५-०६-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) पनवेल शहर पोलीस ठाण्यातील प्राप्त तक्रारी अर्जाचे प्रतीचे अनुषंगाने पनवेल शहर पोलीस ठाण्यात पब्लिक एन सी नंबर २०१५/२०१७, भादंवि ५०७ प्रमाणे दिनांक ०१/१२/२०१७ रोजी अदखलपात्र गुन्हा नोंद करण्यात आला आहे. त्याबाबत मा.प्रथमवर्ग न्यायदंडाधिकारी पनवेल यांची सीआरपीसी १५५(२) प्रमाणे तपास करण्याची परवानगी घेण्यात आली असून त्याप्रमाणे तपास चालू आहे.

(३) डॉ.सुधाकर शिंदे, आयुक्त, महानगरपालिका, पनवेल यांना दिनांक ०३/१२/२०१७ रोजी पासून शहर पोलीस ठाण्यातून कार्यालयीन वेळेत १ सशस्त्र पोलीस कर्मचारी संरक्षणार्थ पुरविण्यात आले आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## ठाणे जिल्ह्यातील भुखंडांना अकृषीक परवानगी देऊन अनधिकृत बांधकामे झाल्याबाबत

**(३७) ३९२९२ (०५-०४-२०१८). श्री.जयवंतराव जाधव, श्री.धनंजय मुंडे, श्री.सुनिल तटकरे, श्री.हेमंत टकले, श्री.अमरसिंह पंडित, ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) ठाणे जिल्ह्यामध्ये मागील पाच वर्षात भुखंडांना अकृषीक परवानग्या देण्यात आल्या अशा भुखंडांवर मोठ्या प्रमाणात अनधिकृत बांधकाम झाल्याबाबतची तक्रार विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद यांनी माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान केली होती, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, ठाणे जिल्ह्यामध्ये दिनांक १ जानेवारी, २०१४ ते आजपर्यंत किती भुखंडांना अकृषीक परवाने देण्यात आले आहेत, सदर अकृषीक परवाने दिलेल्या किती भुखंडावर बांधकाम केले आहेत,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन अनधिकृत बांधकामांवर कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२१-०६-२०१८) :** (१), (२), (३) व (४) ठाणे जिल्हयात अकृषीक परवानगी घेऊन अनधिकृत बांधकामे झाल्याबाबतची मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांची तक्रार माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान प्राप्त झाल्याचे दिसून येत नाही.

ठाणे जिल्हयामध्ये दिनांक १ जानेवारी, २०१४ पासून जवळपास ५२६ भूखंडांना अकृषीक/बांधकाम परवानगी देण्यात आलेल्या आहेत. ठाणे जिल्हयात सहा महानगरपालिका व दोन नगरपालिका अस्तित्वात असून सदर ठिकाणच्या अनधिकृत बांधकामांवर कारवाई करणे ही स्थानिक नियोजन प्राधिकरण म्हणून संबंधी महानगरपालिका / नगरपालिका यांची जबाबदारी आहे. अनधिकृत अकृषीक वापराबाबत महसूल विभागामार्फत महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ मधील तरतूदीनुसार दंडनिय कारवाई करण्यात येत आहे.

---

**राज्यातील 'अटल सौर कृषी पंप योजना' अयशस्वी झाल्याबाबत**

**(३८) ३९४२९ (०५-०४-२०१८). श्री.जगन्नाथ शिंदे, श्री.धनंजय मुंडे, श्री.हेमंत टकले, शरद रणपिसे, श्री.संजय दत्त, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.रामहरी रुपनवर, श्री.आनंदराव पाटील, श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.सुभाष झांबड, डॉ.सुधीर तांबे, श्री.हरिसिंग राठोड, श्री.जर्नादन चांदूरकर, श्री,सतेज ऊर्फ बंटी पाटील, श्री.मोहनराव कदम, श्री.प्रकाश गजभिये :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील शेतकऱ्यांना अटल सौर कृषी पंप योजनेच्या माध्यमातून ५ लाख सौर ऊर्जा पंप देण्याची योजना शासनाने जाहीर करुन याबाबत दिनांक २७ मार्च, २०१५ रोजी शासन निर्णय काढण्यात आला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, त्यानंतर सन २०१६ मध्ये पहिल्या टप्प्यातील १० हजार पंप बसविण्याचा पथदर्शी कार्यक्रम राबविण्याचा निर्णय शासनाने घेतला असला तरी सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी केंद्र शासनाने अनुदान देण्यात

असमर्थता दर्शविल्याने तसेच महावितरण कंपनीने जैन इरिगेशन कंपनी क्लॅरो एनर्जी प्रा.लि. कंपन्यांना काम करु न दिल्याने सदर योजना अयशस्वी झाल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (०२-०६-२०१८) :** (१) व (२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दिनांक २७ मार्च, २०१५ व दिनांक १४ जून, २०१७ च्या अटल सौर कृषीपंप आस्थापित करण्याच्या एकत्रित धोरणाबाबतच्या शासन निर्णयांन्वये अनुक्रमे ७५४० व २४६० असे एकूण १०,००० नग सौर कृषी पंप राज्यात आस्थापित करण्याचा निर्णय घेतला. सद्य:स्थितीत महावितरण या अंमलबजावणी यंत्रणेव्दारे ५६५० इतके सौर कृषी पंप आस्थापित करण्यात आले आहेत. सौर कृषी पंप आस्थापित करण्यासंदर्भातील प्रगतीचा आढावा, केंद्र शासनाची सदर मान्यतेकरीता असणारी केंद्र शासनाची मुदत, नव्याने महाऊर्जामार्फत योजना राबविण्यास मंजुरी, अर्थसहाय्यातील बदल लक्षात घेऊन त्यानुसार योजना राबविण्याचे प्रस्तावित आहे.
(३) प्रश्न उदभवत नाही.
(४) प्रश्न उदभवत नाही.

---

## राज्यातील नगरपालिकांमध्ये कचऱ्यापासून खतनिर्मिती सुरु करण्याबाबत

**(३९) ३९७४६ (०६-०४-२०१८). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्य शासनाच्या “दुसरी हरितक्रांती” अंतर्गत राज्यातील २१० नगरपालिकांनी ओल्या कचऱ्यापासून खतनिर्मिती सुरु केली असून त्यापैकी २७ नगरपालिकांनी प्रत्यक्षात “महाकंपोस्ट” या ब्रॅडखाली सेंद्रिय खताची विक्री सुरु केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त योजनेचे स्वरूप व निकष काय आहेत,
(३) असल्यास, राज्यातील उर्वरित नगरपालिकांमध्ये ही योजना कार्यान्वित करण्यासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२३-०५-२०१८) :** (१) हे खरे आहे.
(२) स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) अंतर्गत राज्यातील शहरांमध्ये घनकचरा व्यवस्थापन करताना, शहरात निर्माण होणाऱ्या विघटनशील कचऱ्यावर शास्त्रोक्त पध्दतीने प्रक्रिया करुन तयार होणाऱ्या सेंद्रिय खताची विपणन व विक्री करण्यासाठी "हरित महासिटी कंपोस्ट" हा ब्रँड वापरण्यास दिनांक २९ एप्रिल, २०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. त्याचे स्वरुप व निकष पुढीलप्रमाणे आहेत.

नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी शहरातील घनकचऱ्याचे निर्मितीच्या जागीच (ॲट सोर्स) ओला व सुका असे विलगीकरण करावयाचे आहे.

संकलित केलेल्या ओल्या कचऱ्यापासून कंपोस्ट खत तयार करावयाचे आहे.

सदर खताची राज्य शासनाने प्राधिकृत केलेल्या कृषी विभागाच्या अथवा मान्यता प्राप्त प्रयोग शाळोमधून घनकचरा व्यवस्थापन नियम, २०१६ व एफसीओ-२०१३ (फर्टीलायझर कंट्रोल ऑर्डर) च्या मानकानुसार तपासणी करणे आवश्यक आहे.

सदर तपासणीचा अहवाल सकारात्मक आल्यानंतर त्या खतास विपणन व विक्री करण्यासाठी "हरित महासिटी कंपोस्ट" हा ब्रँड वापरण्यास परवानगी देण्यात येते. मान्यतेनुसार नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेकडून कार्यवाही करण्यात येते.
(३) घनकचरा व्यवस्थापना अंतर्गत शास्त्रोक्त पध्दतीने कंपोस्ट तयार करण्यासाठी आजपर्यंत २१३ शहरांचे सविस्तर प्रकल्प अहवाल मंजूर करण्यात आलेले आहेत. तसेच उर्वरित शहरांचे सविस्तर प्रकल्प अहवाल देखिल लवकरच मंजूर करण्याचे नियोजित आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## धर्मादाय कार्यालयातील प्रलंबित अर्जाबाबत

**(४०) ४००४७ (०६-०४-२०१८). श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील सर्व धर्मादाय उपायुक्त, सहायक धर्मादाय उपायुक्त यांनी आपआपल्या कार्यालयातील प्रलंबित विनावाद बदल अर्जाचा निपटारा करण्यासाठी दिनांक १५ जानेवारी, २०१८ ते दिनांक १५ फेब्रुवारी, २०१८ या कालावधीत विशेष मोहिम राबविण्याच्या सूचना राज्य धर्मादाय आयुक्त यांनी केल्या आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मुंबईसह राज्यात किती विनावाद बदल अर्ज निकाला अभावी प्रलंबित आहेत,

(३) असल्यास, सदर मोहिमेची प्रकिया कधीपर्यंत पूर्ण होणार आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१०-०५-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.

माहे जानेवारी, २०१८ ते फेब्रुवारी, २०१८ या कालावधीत राज्यातील एकूण ३९७२६ ऐवढे विनावाद बदल अर्ज निकाली निघाले आहेत.

(२) माहे फेब्रुवारी २०१८ अखेर एकूण ७४४२९ विनावाद बदल अर्ज प्रलंबित आहेत. सदर प्रकरणे दाखल होणे व निकाली निघणे ही प्रक्रीया सतत चालूच असते. तसेच अकार्यरत संस्था रद्द करण्याबाबतचे स्वयंखुद्द बदल अर्ज संख्याही प्रलंबित विनावाद बदल अर्जामध्ये समाविष्ट आहे.

(३) सदर मोहिमेचा विस्तारीत कालावधी दिनांक २८ फेब्रुवारी, २०१८ रोजी पूर्ण झाला आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## माथाडी मंडळ स्थापन करण्यासाठी नियुक्त केलेल्या समितीबाबत

**(४१) ४०१०१ (०६-०४-२०१८). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.नरेंद्र पाटील :** सन्माननीय **कामगार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) असंघटीत कामगारांच्या दिवसेंदिवस वाढणाऱ्या संख्येसाठी राज्यात असलेली ३६ माथाडी मंडळे बंद करुन एकच माथाडी मंडळ स्थापन करण्यासाठी नियुक्त केलेल्या समितीमध्ये कामगार संघटनेचा एकही प्रतिनिधी नाही यामुळे असंघटीत कामगारांचे नुकसान होणार असल्याची बाब महाराष्ट्र राज्य हमाल माथाडी महामंडळाचे अध्यक्ष डॉ.बाबा आढाव यांनी दिनांक २१ जानेवारी, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आणली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तदनुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.संभाजी पाटील-निलंगेकर (०५-०७-२०१८) :** (१) व (२) ३६ माथाडी मंडळाचे विलिनिकरण करुन राज्याचे एकच मंडळ स्थापित करण्यास विरोध असल्याबाबत अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य हमाल माथाडी महामंडळ यांचे दिनांक २४/०१/२०१८ रोजीचे पत्र प्राप्त झाले आहे. महाराष्ट्र माथाडी, हमाल आणि इतर श्रमजीवी कामगार (नोकरीचे नियमन व कल्याण) अधिनियम, १९६९ अन्वये निर्माण करण्यात आलेल्या राज्यातील सर्व माथाडी मंडळामध्ये सुसूत्रता ठेवण्यासाठी व अधिनियमामध्ये आवश्यक त्या सुधारणा करण्याच्यादृष्टीने राज्यस्तरावर एकच माथाडी मंडळ गठीत करण्यासाठी अभ्यास गटाची नियुक्ती, शासन निर्णय दिनांक १७/०१/२०१८ अन्वये तसेच दिनांक १४/०३/२०१८ अन्वये सदर अभ्यासगटामध्ये माथाडी कामगारांच्या मान्यता प्राप्त संघटनांचे प्रतिनिधी म्हणून मा.विधानसभा सदस्य, मा.विधानपरिषद सदस्य यांचा समावेश करण्यात आला होता.राज्यातील विविध माथाडी कामगार संघटनांनी दिनांक ३०/०१/२०१८ रोजी पुकारलेला संप व शासनाकडे दाखल केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने अभ्यास गट नियुक्ती

करण्याबाबतचे दिनांक १७/०१/२०१८ व दिनांक १४/०३/२०१८ रोजीचे शासन निर्णय हे दिनांक २७/०३/२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये मागे घेण्यात आले आहेत.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## अमळनेर (जि.जळगांव) येथील रास्त भाव धान्य दुकानावर नियंत्रण ठेवण्याऱ्या दक्षता समित्यांची बैठक आयोजित न केल्याबाबत

**(४२) ४०२०० (०५-०४-२०१८). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **अन्न व नागरी पुरवठा आणि ग्राहक संरक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अमळनेर (जि.जळगांव) तालुक्यातील स्वस्त धान्य दुकानदार व तहसिलदार, अमळनेर यांनी संगनमताने बनावट शिधापत्रिका तयार केल्याचे तसेच स्वस्त धान्य दुकानावर नियंत्रण ठेवण्यासाठी तालुकास्तरावर व नगरपालिका क्षेत्रस्तरावर कार्यरत दक्षता समितीची बैठक मागील २ वर्षापासून तहसिलदार तथा सदस्य सचिव यांच्यामार्फत आयोजित केली नसल्याचे नुकतेच निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन संबंधित दोषींविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीश बापट (०७-०६-२०१८) :** (१), (२) व (३) अमळनेर तालुक्यातील बनावट शिधापत्रिका प्रकरणी तहसिलदार अमळनेर यांच्या कार्यालयास तक्रार अर्ज प्राप्त झाला होता.सदर तक्रार अर्जाच्या अनुषंगाने केलेल्या चौकशीत शिधापत्रिका क्र. YH नं.११४६०२ ही शिधापत्रिका कायदेशीर पध्दतीचा अवलंब न करता हस्तगत केलेली असल्याचे आढळून आल्याने, संबंधित पुरवठा निरिक्षक यांचेविरुध्द अमळनेर पोलीस ठाणे येथे दिनांक ०१/०३/२०१८ रोजी गुन्हा दाखल करण्यात आला असून, महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९८९ मधील तरतुदीनुसार शिस्तभंगविषयक कारवाई जिल्हास्तरावर सुरु करण्यात आली आहे.

सन २०१६-१७ मध्ये अमळनेर नगरपालिकेची निवडणूक, तसेच सार्वत्रिक जिल्हा परिषद, पंचायत समिती व ग्रामपंचायत निवडणुकीची आचारसंहिता असल्याने अमळनेर तालुक्यातील तालुकास्तरीय व नगरपालिकास्तरीय दक्षता समितीच्या बैठका घेण्यात आल्या नाहीत. त्याचप्रमाणे सन २०१६-२०१७ मध्ये पाणीटंचाई व नैसर्गिक आपत्ती असल्यामुळे प्रशासकीय कामकाजाच्या व्यापामुळे सदर दक्षता समितीच्या बैठका घेण्यात आलेल्या नाहीत.

तहसिलदार अमळनेर यांनी दक्षता समितीच्या दरमहा बैठका नियमितरित्या आयोजित न केल्याच्या कारणास्तव जिल्हाधिकारी जळगांव यांचेकडून दिनांक ०८/१२/२०१७ रोजीच्या पत्रान्वये ग्रामस्तरावरील व तालुका पातळीवरील दक्षता समितीच्या दरमहा बैठका घेण्याची सक्त ताकीद तहसिलदार अमळनेर यांना देण्यात आली आहे. त्यानुसार अमळनेर तालुकास्तरीय व नगरपालिकास्तरीय दक्षता समितीची बैठक दिनांक ०५/०२/२०१८, दिनांक १५/०३/२०१८ तसेच दिनांक २१/०५/२०१८ रोजी आयोजित करण्यात आली होती.

---

## राज्यात फळवाले, भाजीवाले, मासे, अंडीवाले विक्रेत्यांना अन्न परवाना सक्ती केल्याबाबत

**(४३) ४०२०४ (०५-०४-२०१८). श्रीमती स्मिता वाघ, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले** : सन्माननीय **अन्न व औषध प्रशासन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात फळवाले, भाजीवाले, मासे, अंडीवाल्यासारख्या किरकोळ विक्रेत्यांना अन्न परवानाशिवाय वस्तू विकता येणार नसल्याचे परिपत्रक अन्न व औषध प्रशासन विभागाने काढले असल्याचे माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, जे किरकोळ विक्रेते असा परवाना घेणार नाहीत त्यांच्यावर गुन्हा दाखल करुन सहा महिन्याची शिक्षा व ५ लाखाचा दंड आकारला जावू शकतो, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर किरकोळ विक्रेत्यांना अन्न परवाना सहज उपलब्ध होण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीश बापट (१३-०६-२०१८) :** (१) हे खरे आहे.
(२) हे खरे आहे.
(३) अन्न परवाना व नोंदणीसाठी ऑनलाईन प्रणाली असून शुल्क
सुध्दा ऑनलाईन पध्दतीने अन्न व औषध प्रशासनाकडून स्विकारण्यात येत आहेत. त्यामुळे परवाना / नोंदणी प्रमाणपत्र सहजरीत्या प्राप्त करण्यास मदत होत आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**यवतमाळ जिल्हाधिकारी कार्यालयातील रिक्त पदे भरण्याबाबत**

**(४४) ४०२६५ (०५-०४-२०१८). श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर, अ‍ॅड.राहुल नार्वेकर :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) यवतमाळ जिल्ह्यात जिल्हाधिकारी कार्यालयासह जिल्हा परिषद, कृषी, क्रीडा या विभागात अप्पर जिल्हाधिकारी, उपजिल्हाधिकारी, नायब तहसिलदार, भूसंपादन अधिकारी, तहसिलदार या अधिकारी संवर्गातील पदे रिक्त असल्याचे माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर रिक्त पदे भरण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (३०-०६-२०१८) :** (१) व (२) यवतमाळ जिल्ह्यात अपर जिल्हाधिकारी संवर्गातील पद भरलेले आहे. उपजिल्हाधिकारी संवर्गातील एकूण २ पदे, तहसिलदार संवर्गात एकूण ४ पदे, नायब तहसिलदार संवर्गातील ३ पदे अशी एकूण ९ पदे रिक्त आहेत. सदर पदे भरण्याची कार्यवाही सुरु आहे. जिल्हा परिषद, कृषी, क्रीडा या विभागामधील रिक्त पदे भरण्याची कार्यवाही संबंधित विभागाकडून करण्यात येते. पदोन्नतीच्या कोट्यातील रिक्त पदे पदोन्नतीने तसेच वित्त विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१५/प्र.क्र.४१/अर्थ- १, दिनांक ०२ जून, २०१५ मधील तरतुदीनुसार सरळसेवेच्या कोट्यातील रिक्त पदांपैकी ५० टक्के किंवा एकूण संवर्गाच्या ४ टक्के यापैकी जे कमी असेल तेवढी पदे सरळसेवेने भरण्याचे संकल्पित आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील मानधनावरील कर्मचाऱ्यांना एकछत्र योजना सुरु करणेबाबत

**(४५) ४०२९४ (०५-०४-२०१८). : तारांकित प्रश्न क्रमांक ३५०१२ ला दिनांक १२ डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील मानधनावरील कर्मचाऱ्यांना “एकछत्र” योजना सुरु करण्याच्या अनुषंगाने राज्यातील कोतवाल तसेच पोलीस पाटील, आशा वर्कर्स, अंगणवाडी सेविका या व अशा मानधनावर असलेल्या अन्य कर्मचाऱ्यांचा एकत्रित विचार करून त्यांना सामाजिक सुरक्षा प्रदान करण्यासाठी “एकछत्र योजना” तयार करण्याकामी दिनांक १८ मार्च, २०१७ च्या शासन निर्णयान्वये अपर मुख्य सचिव (वित्त) यांच्या अध्यक्षतेखाली सचिव समिती गठीत करण्यात आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर समितीकडील अप्राप्त अहवाल शासनास प्राप्त झाला आहे काय,

(३) असल्यास, राज्यातील मानधनावरील कर्मचाऱ्यांना कोतवालप्रमाणे सामाजिक सुरक्षा देण्यासाठी “एकछत्र योजना” सुरु करणेबाबत शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१५-०६-२०१८) :** (१) होय.

राज्यातील "कोतवाल","पोलीस पाटील", "आशा वर्कर्स" व "अंगणवाडी सेविका" या व अशा मानधनावर असलेल्या अन्य कर्मचाऱ्यांचा एकत्रित विचार करुन त्यांना सामाजिक सुरक्षा प्रदान करण्यासाठी "एकछत्र योजना" तयार करण्याकामी, दिनांक १८ मार्च, २०१७ च्या शासन निर्णयान्वये अपर मुख्य सचिव (वित्त) यांच्या अध्यक्षतेखाली सचिव समिती गठीत करण्यात आली आहे.

(२) सदर समितीचा अहवाल प्राप्त व्हावयाचा आहे.

(३) व (४) सदर समितीचा अहवाल प्राप्त झाल्यावर त्याचा विचार करुन पुढील उचित निर्णय घेण्याचे संकल्पित आहे.

---

## औरंगाबाद शहरात शिवाजीनगर भागातून जाणाऱ्या रेल्वेलाईनवरती उड्डाणपुल बांधण्याबाबत

**(४६) ४०३५८ (०६-०४-२०१८). श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) औरंगाबाद शहरात मोठ्या प्रमाणात गर्दी असलेल्या शिवाजीनगर भागातून जाणाऱ्या रेल्वेलाईनवरती उड्डाणपुल बांधण्याबाबत शासनस्तरावरुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी केलेल्या कार्यवाहीचे स्वरुप काय आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०९-०७-२०१८) :** (१) व (२) भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरणामार्फत मुकुंदवाडी व शिवाजीनगर येथे उड्डाणपूल बांधण्यासाठी प्रकल्प अहवाल केंद्र शासनास दिनांक ३१/०३/२०१७ रोजी सादर करण्यात आले असून अद्याप मंजूरी अप्राप्त आहे. केंद्र शासनाकडून मंजूरी व

उड्डाणपूलाच्या बांधकामासाठी असलेली जागा स्थानिक प्राधिकरणाने उपलब्ध करुन दिल्यानंतरच प्रकल्प कार्यान्वित होऊ शकेल, असे प्रकल्प संचालक भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण, औरंगाबाद यांनी कळविले आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**आदिवासीच्या जमिनीला अधिक संरक्षण देण्याच्या**
**अधिसूचनेत बदल केल्याबाबत**

**(४७) ४०४१६ (०३-०४-२०१८). श्री.प्रविण दरेकर, श्री.नागोराव गाणार, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मा.राज्यपालांनी माहे जून, २०१६ मध्ये जाहिर केलेल्या अधिसूचनेमुळे अनुसूचित क्षेत्रातील आदिवासींच्या जमिनीला अधिक संरक्षण प्राप्त केले असतांना पूर्वीच्या अधिसूचनेत बदल करुन दिनांक १४ नोव्हेंबर, २०१७ रोजी नविन अधिसूचना काढण्यात आली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, नविन अधिसूचनेत कोणता बदल करण्यात आला, त्याची कारणे काय आहेत तसेच या बदलामुळे पुन्हा आदिवासींवर अन्याय होणार आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, याबाबत शासनाची भूमिका काय आहे ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१८-०६-२०१८) :** (१), (२) व (३) मा.राज्यपाल महोदय यांनी भारतीय राज्यघटनेच्या पाचव्या अनुसूचीमधील परिच्छेद क्र.५(१) मधील प्राप्त अधिकारानुसार दिनांक १४/०६/२०१६ रोजीची अधिसूचना काढून “महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६” मधील कलम ३६-अ ची तरतूद राज्यातील अनुसूचित क्षेत्रासाठी सुधारीत केली आहे. त्यानुसार राज्यातील अनुसूचित क्षेत्रातील गावांमध्ये ग्रामसभेची, ठरावान्वये मंजूरी मिळाल्याशिवाय आदिवासी व्यक्तीच्या जमिनीचा भोगवटा बिगर आदिवासी व्यक्तीकडे हस्तांतरीत करण्यास मंजूरी देवू नये अशा आशयाची तरतूद केली आहे.

उक्त नमूद सुधारणेमुळे केंद्र शासन तसेच राज्य शासनाच्या प्रकल्पांचे काम खोळंबून राहू नये व त्यांची कार्यपूर्ती विहित कालमर्यादेत व्हावी या दृष्टीने निकडीच्या सार्वजनिक प्रकल्पांना ग्रामसभेच्या पुर्वमंजूरीच्या अटीमधून सूट मिळण्याच्यादृष्टीने दिनांक १४/११/२०१७ रोजीची अधिसूचना काढून "महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६" मधील कलम ३६-अ मध्ये सुधारणा केली आहे. त्यानुसार अनुसूचित क्षेत्रातील गावांमध्ये आदिवासी व्यक्तींची जमीन शासनाच्या निकडीच्या प्रकल्पांसाठी सामंजस्याने खरेदी करण्यासाठी कलम ३६-अ खालील परवानगी आवश्यक राहणार नाही. मात्र आदिवासी व्यक्तींना पारदर्शकपणे सुयोग्य मोबदला देणे आवश्यक राहील.

---

## राज्यातील १४ ते १८ वर्षे वयोगटातील मुलांना दर्जेदार शिक्षण देण्याबाबत

**(४८) ४०४९३ (०५-०४-२०१८). श्री.धनंजय मुंडे : तारांकित प्रश्न क्रमांक २६८३७ ला दिनांक २० मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील १४ ते १८ वर्षे वयोगटातील मुलांना अनेक मूलभूत गोष्टी देखील नीटपणे उमगत नसून मातृभाषा सुध्दा वाचता येत नसल्याचा अहवाल असर या संस्थेने शासनाला सादर केला, शासनाने त्यानुसार प्रगत शैक्षणिक महाराष्ट्र हा कार्यक्रम सुरु केला, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर कार्यक्रम राबविण्याची फलनिष्पत्ती काय आहे ?

**श्री.विनोद तावडे (१८-०६-२०१८) :** (१) हे खरे नाही.

राज्यातील मुलांची शैक्षणिक गुणवत्ता वाढविण्याच्यादृष्टीने दिनांक २२ जून, २०१५ च्या शासन निर्णयान्वये प्रगत शैक्षणिक महाराष्ट्र हा कार्यक्रम सुरु करण्यात आला आहे. तर असर अहवाल २०१७ या वर्षातील आहे.

(२) मार्च, २०१८ अखेर स्तर निश्चिती कार्यक्रमाअंतर्गत राज्यातील विद्यार्थ्यांच्या वाचन क्षमतेमध्ये ७३.१८% इतकी वाढ झाल्याचे दिसून येते.

---

## सिव्हिल डिफेनस कार्पोसच्या जवानांच्या तुकडीचा उपयोग करुन घेण्याबाबत

**(४९) ४०४९६ (०६-०४-२०१८). श्रीमती विद्या चव्हाण :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मनुष्य निर्मित आणि नैसर्गिक आपत्तीचा सामना करण्यासाठी सन २००९ साली स्थापन करण्यात आलेल्या सिव्हिल डिफेनस कार्पोसच्या अग्नि प्रतिबंधक आणि सुरक्षेचे शिक्षण घेतलेल्या ५४० जवानांच्या तुकडीचा कधीही उपयोग करुन घेण्यात आला नसल्याचे दिनांक १९ जानेवारी, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तदनुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१५-०६-२०१८) :** (१) हे खरे नाही.

नागरी संरक्षण दलाचे मुख्य कामकाज प्रशिक्षण व प्रशासनाद्वारे आपत्ती व्यवस्थापनाच्या कामकाजात सहभाग नोंदवून लोकांना मदत करणे हे आहे. सद्य:स्थितीत आकृतीबंधानुसार नागरी संरक्षण संचालनामध्ये एकूण ४३५ पदे आहेत. प्रत्यक्षात २७७ कर्मचारी कार्यरत आहेत. त्यापैकी नागरी सरंक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील राज्य फिरते आणीबाणी सेनास्तंभ या कार्यालयामध्ये एकूण ५६ कर्मचारी कार्यरत आहेत. राज्य फिरते दलामध्ये अग्शिमन व विमोचन शाखा असून त्या कर्मचाऱ्यांना अग्नि व सुरक्षेचे प्रशिक्षण दिले जाते. सद्य:स्थितीत अग्निशमन/विमोचक या कर्मचाऱ्यांची

संख्या २८ आहे. कोणत्याही दुर्घटनेबाबत मुख्य नियंत्रण कक्षातून संदेश प्राप्त झाल्याव सदर कर्मचारी हे दुर्घटनास्थळी जाऊन मदतकार्य व प्रथमोचाराचे कर्तव्य करतात.
(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## पुणे शहर व परिसरात वाहनांची तोडफोड होत असल्याबाबत

**(५०) ४०५९६ (०६-०४-२०१८). ॲड.जयदेव गायकवाड :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) पुणे शहर व आजुबाजुच्या विस्तारीत उपनगरामध्ये स्वारगेट येथील महर्षीनगर, वारजे येथील रामनगर, बापूजी चौक, गुंजाळ वस्ती, सांगली भाग, पिंपरी-चिंचवड, पिंपळे गुरव, नेहरुनगर, थेरगांव, भोसरी परिसर, हडपसर, ससानेनगर, खडकी परिसर इत्यादी ठिकाणी रिक्षा, टॅक्सी, टेम्पो, दुचाकी, चारचाकी, जीप, रुग्णवाहिका इत्यादी वाहनांची तोडफोड व जाळपोळ करुन दहशत निर्माण करण्याचे प्रकार गेल्या ६ ते ८ महिन्याच्या कालावधीत मोठ्या प्रमाणात घडले आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, प्रश्न भाग (१) मध्ये नमूद ठिकाणी वाहनांच्या झालेल्या तोडफोड व जाळपोळ प्रकरणात अंदाजे किती आर्थिक नुकसान झाले आहे,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तदनुसार संबंधिताविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१३-०६-२०१८) :** (१), (२) व (३) पुणे शहर पोलीस आयुक्त कार्यक्षेत्रात मागील ०८ महिन्याच्या कालावधीत वाहनांची तोडफोड व जाळपोळ केल्याबाबत एकूण ३० गुन्हे दाखल असून त्यामध्ये ८९ आरोपींना अटक करण्यात आलेली आहे. सदर घटनांमध्ये दुचाकी-चारचाकी वाहनांचे ६५,९०,४००/- रुपयांचे नुकसान झालेले आहे.

सदर प्रश्नातील नमूद परिसरातील विविध घटनांच्या अनुषंगाने एकूण १६ गुन्हे दाखल असून यापैकी ४ गुन्ह्यात दोषारोपपत्र सादर करण्यात आले आहे. उर्वरित गुन्ह्यांचा तपास सुरु आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**विधान भवन :** **डॉ. अनंत कळसे**
**नागपूर.** **प्रधान सचिव,**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

---

मुद्रणपूर्व सर्व प्रक्रिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मुद्रणालय, नागपूर.